


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्धारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्धारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्धारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.












सौंदर्य आणि प्रमाणबद्धता यांसाठी प्रसिद्ध असलेल्या
निर्णयसागर टाइप फाउंड्रीचे संस्थापक जावजी दादाजी चौधरी

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १८ : अंक २ उन्हाळा २०००

## -अनुक्रम-



---


- ☐ प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
- ☐ संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
- ☐ संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव, सुप्रिया, ६१/१४ एरंडवणे, पुणे ४११००४. दूरध्वनी : ५४६ ८६९३
- ☐ व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११००४. दूरध्वनी : ५४३ ३८६९
- ☐ पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरणपृष्ठ तीन पहा.
- ☐ सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/ लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
- ☐ या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
- ☐ संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
- ☐ मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९.

संपादकीय

# अनुभवांच्या खाणी

मृणालिनी शहा

आपल्या मातृभाषेला, बोलीभाषेला निरखून पाहण्याचा प्रयत्न आपण क्वचितच करतो. त्यामुळे भाषेची वैशिष्ट्ये, तिची समृध्दी, तिच्या लकबी तिचे गुणदोष, तिचे वेगळेपण आपल्या लक्षातही येत नाही. किंबहुना भाषेचे सौंदर्य पहायचे असते हेही आपल्या गावी नसते. सौंदर्य किंवा लालित्य यांचा संबंध फक्त ललितसाहित्याशीच असतो अशी आपली समजूत असते. ही समजूत खरीही आहे. परंतु भाषेचे सौंदर्य हे फक्त साहित्यापुरतेच मर्यादित नसते ही गोष्ट देखील तेवढीच खरी आहे. हे सौंदर्य अनेकप्रकारचे असते. भाषेच्या शब्दांमध्ये, शब्दांच्या नादांमध्ये आणि खरेतर शब्दांच्या अर्थामध्येही ते दडलेले असते. बोली भाषेतील सौंदर्य हे काही प्रमाणात त्यातील म्हणी, वाक्प्रचार आणि सुभाषिते यांमध्ये सामावलेले असते. मराठी भाषेचा अथवा मराठी साहित्याचा मागोवा घेतला तर मराठी भाषा प्रारंभापासून म्हणी आणि वाक्प्रचार यांनी समृद्ध आहे.

लोकपरंपरेने आलेले नीतिबोधक किंवा दृष्टांताद्युपयोगी, लोकमान्य झालेले सुटसुटीत आणि चटकदार असे दृष्टांतभूत वाक्य म्हणजे म्हण. ही कहाणी, उखाणा याप्रमाणे मूलत: मौखिक अशा लोकसाहित्यात जमा होणारी, पण छोटेखानी गद्य वाङ्मयकृतीच असते. ''नावडतीचे मीठ आळणी'', ''उथळ पाण्याला खळखळाट फार'' किंवा ''घर पहावे बांधून व लग्न बघावे करून'' अशा म्हणींमध्ये, मोठा आशय थोडक्यात मांडलेला असतो, याची प्रचिती येते. शिवाय यमक, अनुप्रास, अतिशयोक्ती, उपमा इत्यादी अलंकारांमुळे ती चटकदार बनते.

म्हणींप्रमाणे वाक्प्रचारही भाषेमध्ये महत्त्वाची भूमिका पार पाडत असतात. भाषेत असे काही शब्द वा शब्दसमूह येतात की, त्यांचा शब्दश: अर्थ घेऊन चालत नाही. रुढीने किंवा परंपरेने त्यांना त्यांच्या मूळ अर्थापेक्षा वेगळाच अर्थ प्राप्त झालेला असतो व तोच भाषेत रुढ होऊन बसतो, ''कपिलाषष्ठीचा योग'' किंवा ''काखेत कळसा, गावाला वळसा'' सारख्या शब्दांच्या मूळ अर्थापेक्षा भिन्न व विशिष्ट अर्थाने रुढ होऊन बसलेल्या शब्दसमूहाला वाक्प्रचार म्हटले जाते. म्हणींप्रमाणे ते पूर्ण वाक्य नसते. तो वाक्याचा भाग असतो व तो संदर्भानेच समजतो. म्हणी आणि वाक्प्रचार यांचा सामान्यत: एकत्रित विचार केला जातो. या दोन्हींत सांस्कृतिक संदर्भाच्या आणि अर्थालंकारांच्या बळावर थोडक्यात बराच अर्थ आणलेला असतो. त्या त्या समाजाच्या संस्कृतीमधले विशिष्ट विषयाबद्दलचे शहाणपण त्यांच्यात साठवलेले असते





अनुक्रमणिका

आणि एका पिढीने पुढच्या पिढीच्या ते हवाली केलेले असते.

मात्र गेल्या वीस-पंचवीस वर्षांपासून विशेषत: गेल्या दहा वर्षांपासून तर म्हणी, वाक्प्रचार या लकबी भाषेतून लोप पावत चालल्या आहेत की काय, अशी शंका येते आणि मग त्याचा शोध घेण्याची गरज भासते. माध्यमिक शाळेतील अभ्यासक्रमात, ''म्हणी आणि वाक्प्रचार यांचा अर्थ सांगून वाक्यात उपयोग करा.'' या प्रश्नाच्या निमित्ताने मुलांना त्यांची ओळख होत असली तरी ही नवीन पिढी त्यांचा फारसा वापर करताना दिसत नाही. याचे एक कारण असे दिसते की, आधीच्या पिढीकडून संक्रमित होणाऱ्या भाषेतून हा सांस्कृतिक ठेवा या नव्या पिढीपर्यंत पोहचलेला नाही किंवा हा वारसा पोहचला तरी रोजच्या जीवनातील बदललेल्या राजकीय, सामाजिक आणि सांस्कृतिक संदर्भांमध्ये, या जुन्या संकेतांना फारसे स्थान उरलेले नसावे. खरेंतर कोणत्याही म्हणीची निर्मिती ही प्रचलित अनुभवातून झालेली असते.त्यामुळे कालमानानुसार भाषेचे सामाजिक आणि सांस्कृतिक संदर्भ बदलले की काही म्हणी वा वाक्प्रचार कालबाह्य होतात. उदा. ''चांभाराच्या देवाला खेटराची पूजा'', ''नमनाला घडाभर तेल'' इत्यादी. मात्र मानवी जीवनासंबंधीच्या म्हणी चिरकाल टिकून राहतात असे म्हटले जाते. उदा.''दाम करी काम'', ''शीतावरून भाताची परीक्षा'' वगैरे. परंतु आज अशा म्हणी वा वाक्प्रचार ऐकू येत नाहीत.

आपल्या परंपरेचा आणि मराठी भाषेचा सांस्कृतिक ठेवा आपण गमावत आहोत, याची खंत वाटते. ही खंत व्यक्त करत असतानाच नव्या संदर्भाचे काही नवे वाक्प्रचार निर्माण होत आहेत का, याचाही शोध घेणे आवश्यक आहे. पूर्वीचे पारंपारिक वाक्प्रचार हे प्रामुख्याने शेती, ग्रामरचना, धर्म, कारागिरी इत्यादी जीवन वैशिष्ट्यांवर आधारलेले होते. गेल्या तीस-चाळीस वर्षांच्या, स्वातंत्र्यानंतर जीवन क्रमात बदल झाला. आधुनिक काळातील विज्ञान, तंत्रविद्या आणि शहरी जीवन यांच्या अनुभवांवरील म्हणी मात्र जवळजवळ दिसत नाहीत. काळाप्रमाणे या वाङमयात फारसा बदल झालेला दिसत नाही. जीवनाचा खोलवर अनुभव घेऊन त्यातून म्हण अथवा वाक्प्रचार तयार होणे सध्याच्या चंगळवादी आणि वेगवान जीवनात शक्यच नाही काय?

या पार्श्वभूमीवर खेडी, निमशहरे आणि शहरे इत्यादी ठिकठिकाणच्या लोकांच्या भाषेची पाहणी केली तर काही माहिती आपल्याला मिळू शकेल. अशा अभ्यासाच्या दिशेने एक प्रयत्न म्हणून पुणे शहरातील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या किंवा तरुणांच्या भाषेचे निरीक्षण येथे मांडले आहे. अर्थातच ती भाषाशास्त्रीय पाहणी

नाही आहे. सहजतेने जे कानावर येते ते मांडण्याचा हा एक मर्यादित प्रयत्न आहे. तरुणांच्या भाषेवर किंवा एकूणच भाषेवर इंग्रजी भाषेचा-इंग्रजी शब्दांचा प्रभाव असल्याचे ध्यानात येते. त्याचप्रमाणे हिंदी सिनेमा आणि त्यातील जीवनाचाही परिणाम जाणवतो. काही नवे वाक्प्रचार आढळतात. या नव्या वाकखप्रचारांनी युक्त अशी काही वाक्ये पाहणे मनोरंजक ठरेल.

- एखादा मुलगा मुलीला पटविण्यासाठी तिच्यावर **लाईन मारतो** आणि मग एखाद्याला **ग्रीन सिग्नल** मिळतो तर एखाद्याला **रेड सिग्नल** मिळतो.
- आपले जीवन यशस्वी होण्यासाठी एखादा तरी **गॉडफादर** आपल्याला भेटेल असा विश्वास या तरुणांना वाटतो.
- शास्त्रज्ञांप्रमाणे कुणाल देखील **पांढऱ्या उंदरावर** प्रयोग करत असतो. स्वतः मात्र **प्रयोगाचे पिल्लू** व्हायला त्याला बिलकूलच आवडत नाही.
- ''हेल्थ इज वेल्थ'' हे सायलीला ठाऊक असल्याने ती वर्गातील मुलांना **आरोग्य हीच खरी संपत्ती** असे सांगत असते.
- मद्यपानानंतर श्रीयुत काळे यांचे **विमान हवेत उडत** असते.
- कुमारला लव्हेरीया झाला आहे. त्यामुळे तो म्हणत असतो **''गॉड इज ग्रेट''**
- उज्ज्वलाने प्रेमभंगाचा **काळा चष्मा** घातला आहे म्हणून तिला सगळं जगंच **काळं दिसतंय.**
- सुरेश हा **चारसो बीस** मुलगा आहे.
- मीनाचे बोलणे म्हणजे **पंजाब मेल** आहे.
- पुण्याजवळील वडगावातील अजित म्हणतो की, ''आमचं जीवन म्हणजे **पॅसेंजर** आहे.''
- प्रेमाच्या बाजारात आशिशचा **चेक वटला** नाही.
- हल्लीच्या मुलींना **झट मंग़नी पट शादी** आवडते.
- मुलाखतीला गेल्यावर आनंदची कधी **यष्टी** पडते तर कधी **शटर डाऊन** होते.
- रीना सुजाताला सांगत होती, ''गेल्या पंधरा दिवसात मी एकदाही ट्रॅफीक जाम मध्ये अडकले नाही... **टच वुड...''**

याशिवाय फ्लॅट होणे, झेंडा लावणे, करंट येणे, करंट लागणे, हिरोगीरी करणे, वासुगीरी करणे, बोलकी बाहुली, बिनबुडाची बाहुली, वडा होणे, आहे तोवर

हिरो नाहीतर झिरो, फुसका बार, फसफसून वर येणे, बर्फ होणे, स्टॅच्यू होणे, ट्युब पेटणे, गोची होणे, हवा टाइट होणे, गेम खेळणे, डोक्यात हवा जाणे असे नवनवीन भाषा प्रयोग सांगता येतात.

याशिवाय अजून कितीतरी वाक्प्रचार तुमच्या आमच्या आसपास ऐकले-बोलले जात असतील. काळ बदलला की भाषा बदलणारच. नवे वाक्प्रचार आले पण नव्या म्हणी आल्या आहेत का ? असा प्रश्न पडतो. म्हणी किंवा वाक्प्रचार हे एक प्रकारे समाजाच्या वैशिष्ट्यातून जन्माला येत असतात. त्या त्या समाजाच्या रचनेतून त्यांची निर्मिती होत असते. या दृष्टीने त्यांना सामाजिक परिमाण लाभलेले असते. सामाजिक अभ्यासाला अशा प्रकारच्या भाषिक पाहणींची व त्यातील निरीक्षणांची मदत होत असते. तशीच भाषेच्या समाजशास्त्रीय अभ्यासाला म्हणी व वाक्प्रचारांची मदत होत असते.

■■■

''पाणिस्पर्शच आमुचा शकतसे वस्तूंप्रती द्यावया-
सौंदर्यातिशया, अशी वसतसे जादू करांमाजि या;''
- केशवसुत, ''आम्ही कोण?'' फैजपूर, २९ नोव्हेंबर, १९०१

हे उद्‌गार जावजी दादाजींच्या कोरीव ठशांच्या संदर्भात सार्थ ठरतात.

-संपादक

*(वर्ष १८:१। हिवाळा २००० या अंकामध्ये डॉ. द. न. गोखले यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. अंकाची छपाई चालू असतानाच गोखले यांच्या दुःखद निधनाची वार्ता कानी आली. त्यांनी पत्रिकेला पुरेसे सहकार्य केले आहे. त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करत आहोत.*
*- संपादक)*





अनुक्रमणिका

# भाषेचे जागतिकीकरण आणि जागतिकीकरणाची भाषा

अशोक रा. केळकर

## भाषेचे जागतिकीकरण

जागतिकीकरणाची आजची सुरुवात जरी व्यापार उद्योगाच्या क्षेत्रापासून झालेली असली, तरी हळूहळू ती क्रिया जीवनाच्या इतर क्षेत्रांनाही व्यापू लागली आहे. भाषाही याला अपवाद नाही. सिनेमा, बँक, रेल्वे, फुटबॉल, रेनसांस, ग्लास्नोस्त, सत्याग्रह हे शब्द जितके जागतिक झालेले आहेत तितकेच नोकरशाही, मेंदू-धुलाई, आविष्कारस्वातंत्र्य, जागतिकीकरण हे शब्द उगमाने जागतिक आहेत. जसे शब्द जागतिक ठरतात तशा भाषाही जागतिक ठरू शकतात. फ्रेंच, इंग्लिश, स्पॅनिश या पहिल्या जागतिक भाषा. संयुक्त राष्ट्र संघटनेने या यादीत चिनी आणि रशियन यांची भर घातली. यथावकाश अरबी, हिंदी, कदाचित जपानी यांची त्यात भर पडावी. (विद्यासंपादनाच्या क्षेत्रापुरता विचार केला तर जर्मन, संस्कृत, ग्रीक, आणि लॅटिन यांचीही त्यात भर पडेल.)

या सगळ्या जागतिक भाषांमध्ये इंग्रजीचे स्थान आज वरचढ आहे हे उघड आहे. पर्यटकांच्या सोयीसाठी पूर्वी इथे फ्रेंचमध्ये बोलले तर चालेल अशा पाट्या लावीत असत, नंतर इंग्रजी बोलण्याबद्दल पाट्या लागू लागल्या, आज तर तशा पाट्याही लावाव्या लागत नाहीत. या स्थानासाठी इंग्रजी भाषेला काही किंमतही मोजावी लागते.

अक्षर ओळखीला सोप्या रोमन लिपीत ही लिहिली जाते किंवा फ्रेंच, स्पॅनिश, रशियन भाषांप्रमाणे तिच्यात लिंगांचा गोंधळ नाही याबद्दल परभाषिक, इंग्रजीला जसा दुवा देतात तसेच तिच्या फ्रेंच भाषेइतक्याच तऱ्हेवाईक स्पेलिंगबद्दल शिव्याही देतात. १९५६ साली मी जेव्हा पहिल्यांदा अमेरिकेला गेलो तेव्हा माझे इंग्रजी ऐकून जकात अधिकारी बाईने सुटकेचा श्वास सोडला, आणि ती म्हणाली, 'आमची भाषा जागतिक झाली आहे खरी, पण त्यामुळेच तिचे राजरोस खून पडताना सारखे ऐकावे लागते. तुमचे चांगले इंग्रजी ऐकून जरा बरे वाटले.' हा सगळा विनोदाचा भाग सोडला तरी इतरही अधिक महत्त्वाच्या बाबी आहेत. पहिली म्हणजे इंग्रजी शब्दकोशाचे दरवाजे इतर भाषांतून उसने घेतलेल्या शब्द आणि वाक्प्रचार यांच्यासाठी सताड उघडे ठेवावे लागले. ही उसनवारी कधी सरळसरळ (चिनी टायफून) तर कधी अनुवादाच्या आडपडद्याने (ब्रेनवॉशिंग हा चिनी वाक्प्रचार) करावी लागते इतकेच. (फ्रेंच भाषिकांना हे शहाणपण बऱ्याच उशिरा सुचले.) दुसरे म्हणजे इंग्रजी भाषकाला परभाषिकांशी व्यवहार करताना आपल्या भाषेला मुरड घालावी लागते- कधी त्यांनी वारंवार केलेल्या चुका भाषेत

सामावून घेऊन, कधी सोपी शब्दयोजना करून, कधी स्वतःच्या संस्कृतीशी अति निगडित शब्दयोजना टाळून, तर कधी परकीयांच्या सवयींची आणि भावनांची कदर करून. (उदा. बिलियन म्हणजे एकावर १२ शून्ये न ठेवता एकावर ९ शून्ये ठेवणे, अविकसित न म्हणता विकसनशील अर्थव्यवस्था असे म्हणणे, 'मोहमेडन' शब्द न वापरता 'मॉज्लेम किंवा 'मुस्लिम' शब्द वापरणे.)

जी गत इंग्रजीची तीच थोड्या कमी प्रमाणात का होईना इतरही संपर्कभाषा होऊ पाहणाऱ्या भाषांची. प्रमाण हिंदीला भारताची संपर्कभाषा म्हणून किंवा प्रमाण मराठीला महाराष्ट्राची संपर्क भाषा म्हणून हे सर्व करावे लागते आहे. विद्याक्षेत्रातली संपर्कभाषा होण्यासाठी संस्कृत अधिक 'सोपी' करावी ही अपेक्षा पुढे येऊ लागली आहे. जागतिकीकरण केवळ जागतिक भाषांचेच नव्हे तर कमी-अधिक प्रमाणात सर्वच संपर्कभाषांचेही होत असते.

भाषा शिकण्यातली अनिच्छा आणि वाटणारा त्रास दूर करून कोणत्याही आधुनिक म्हणवून घेणाऱ्या समाजाला परभाषा शिकण्याच्या सोयी विविध, विपुल, दर्जेदार कराव्या लागतात. भाषिक भिंतींमधून सुटका होण्याचा तो एक राजमार्ग आहे. काही वर्षांपूर्वी दुभाषी मंडळींच्या मदतीने संस्कृत पंडित आणि पाश्चात्त्य पद्धतीने विद्याविभूषित यांच्यामध्ये पुणे, उज्जैन इत्यादी ठिकाणी संवाद घडवून आणण्याचा उपक्रम प्रा. दयाकृष्ण आणि प्रा. मे. पुं. रेगे यांच्या पुढाकाराने झाला होता. त्यात भाग घेणाऱ्या दोन्ही पक्षांच्या मंडळींना फायदा झाला, विद्येचे नवीन भांडार उपलब्ध झालेच पण विचार करण्याच्या नवीन पद्धतींशी परिचय झाला ही भावना उभयपक्षांनी बोलून दाखवली. भाषेतील नैपुण्य वाढल्यामुळे केवळ दृश्य प्रतिमांचा किंवा गोड सुरांचा बडिवार माजवण्याच्या आधुनिक प्रसारमाध्यमांच्या प्रवृत्तीपासून सुटका होऊ शकेल. पुस्तकात किंवा मासिकात चित्रे जरूर असावीत. पण मजकूर वाचण्याचा कंटाळा करून फक्त चित्रे चाळणे म्हणजे चित्रांच्या भिंतीमध्ये अडकून पडणे. आपली भाषा परकीयांशी संपर्क साधायला किंवा त्या त्या प्रसारमाध्यमाला अनुकूल करून घेण्यासाठी बदलावी हे ठीकच आहे. मात्र त्यामुळे प्रवाही बोली भाषा आणि प्रौढ ग्रांथिक भाषा यांच्यामधले अंतर कमी होणार हे नक्की. विचारांच्या प्रसाराला महत्त्व आल्यावर विचार अधिकाधिक सोप्या शब्दांत मांडला जावा ही मागणी आलीच. पण त्याचबरोबर आजचे गुंतागुंतीचे जग समजावून घेणारे विचार गुंतागुंतीचे असणार; यामुळे सामान्य माणसाची विचार

समजावून घेण्याची भाषिक कुवत थोडी तरी वाढायला पाहिजे ही शैक्षणिक मागणीही आलीच. सोपी मांडणी म्हणजे बाळबोध मांडणी नव्हे! जागतिकीकरण हितकारक व्हायचे असेल तर विचारांच्या शर्यतीत कोणत्याच समाजाला मागे राहून चालणार नाही. समाजातील विचारवंतांचे काम गुंतागुंतीचे विचार करणे एवढेच नसून ते जमेल तितके सामान्यांपर्यंत पोचवायचे कामही त्यांच्यावर येऊन पडले आहे आणि त्यासाठी आवश्यक ते भाषिक नैपुण्य त्यांनी मिळवायला पाहिजे.

जागतिकीकरणाच्या क्रियेमध्ये दोन परस्परविरुद्ध प्रेरणा काम करत असतात. ('प्रौढ' भाषेत सांगायचे तर प्रेरणा कार्यरत असतात!) एक आहे केंद्रीकरणाची प्रेरणा: उदा. जगभर मेट्रिक मापनपद्धती असावी, रस्त्याच्या कोणत्याही एकाच बाजूने वाहने चालावीत, रोमन लिपी स्वीकारणारांनी कळफलकावर अक्षरांची एकच मांडणी स्वीकारावी, ई-मेलचे पत्ते निश्चित करण्याचे काम एकाच ठिकाणी व्हावे, मालाच्या दर्जाची मापके आय-एस-ओ कडूनच ठरावी. याच्या उलट दुसरी आहे विकेंद्रीकरणाची प्रेरणा: उदा. जगाच्या बाजारपेठेत आपला माल मांडायचा तर तो त्या त्या स्थानिक गरजांना आणि सवयींना अनुरूप असा मांडावा, रोमन लिपी स्वीकारणारांनी अक्षरांचे वळण एकसारखे ठेवण्याची गरज नाही, कुणालाही विविध वळणांमधून निवड करायची संधी मिळावी. ह्या दोन्ही प्रेरणांचा हितकारक मेळ घालावा लागतो. कोणती एकच प्रेरणा शिरजोर झाली तर ते हानिकारक होऊ शकते.

भाषेच्या जागतिकीकरणातही हा दोन प्रेरणांचा सगळा विचार लागू पडतो. सगळ्यांनी निदान गरजेपुरते इंग्रजी शिकावे ही केंद्रीकरणाची मागणी, तर जागतिक पातळीवर वापरायची इंग्रजी गरजेनुरूप आणि स्थानानुरूप लवचिक राहावी ही विकेंद्रीकरणाची मागणी. पण हा लवचिकपणा वारेमाप झाला तर केरळी माणसाला आसाममधलं इंग्रजी कळणार नाही आणि आसामी इंग्रजी केरळी माणसाला कळणार नाही हे घडू शकते! म्हणजे आली सुयोग्य मेळ घालण्याची मागणी. संपर्कभाषा एकच एक म्हणजे बहुउद्देशीय असावी (उदा. इस्लामी जगाच्या मोठ्या भागात अरबी केवळ धर्मव्यवहाराची भाषा न राहता विद्येची आणि राज्यकारभाराची भाषा ठरली) ही केंद्रीकरणाची मागणी तर विविध उद्देशांसाठी वेगवेगळ्या संपर्कभाषा मान्य कराव्या, (उदा. प्रादेशिक संपर्क भाषा, हिंदी, इंग्रजी हे त्रिभाषासूत्र), पण इथेही मेळ घालावा लागतो (उदा. भारताच्या संविधानात अनुसूचित भाषांची यादी किती वाढू द्यायची हा

विचार). संपर्क भाषांच्या या शर्यतीत काही लहान भाषा इतिहासाच्या ओघात पुढे आल्या (उदा. पोर्तुगीज) तर काही मागे पडल्या (उदा. स्पेन-फ्रान्सच्या सीमेवरची बास्क भाषा). काही मागे पडलेल्या भाषांनी लढा देऊन तो जिंकलाही (उदा. स्पेनमधली कॅटलन, गोव्याची कोकणी, वेल्श ) पण काही अंशी 'मी जिंकलो मी हरलो' अशी त्यांची स्थिती झाली. एकीकडे शाळा, वृत्तपत्रे चालवणे मुश्कील झाले, पण दुसरीकडे किंवा वेल्शमधला वार्षिक काव्यमहोत्सव साहित्य अकादेमीची भाषासूची संविधानातल्या भाषासूचीपेक्षा अधिक समावेशक आहे हेही पाहण्याजोगे आहे. या सगळ्याच घटनांमधून एक महत्त्वाचा बोध घेण्यासारखा आहे.

भाषा म्हणजे केवळ विचार, भावना, इच्छा एकमेकांना कळवण्याचे व्यावहारिक पातळीवरचे संज्ञापन साधन नाही. भाषा म्हणजे केवळ आपापल्या लहानमोठ्या अस्मिता जपण्याचे सामाजिक प्रतीक नाही. (मी महाराष्ट्रीय आहे, मी भारतीय आहे अशा लहानमोठ्या अस्मिता असू शकतात.) भाषा म्हणजे याहीपेक्षा काही अधिक आहे. भाषा म्हणजे माणसाची काव्यात्म, आध्यात्मिक, वैचारिक सर्जनशीलता फुलवण्याचे माध्यमही आहे. भाषेच्या जागतिकीकरणाच्या क्रियेत हा महत्त्वाचा बोध हरवून चालणार नाही.

वेल्शभाषिक नित्याची संपर्कभाषा म्हणून इंग्रजीत व्यवहार करीत असले तरी त्यांच्यापैकी काही कवी तरी वेल्श भाषेत कविता रचणे पसंत करतात. लहानपणी ग्रामीण बोली बोलणारा मराठी माणूस पुढे संपर्कभाषा म्हणून प्रमाण मराठीचा वापर करू लागला तरी त्याला आपले भावजीवन आपल्या ग्रामीण बोलीतूनच व्यक्त करावेसे वाटेल. कॅथलिक ख्रिस्ती मंडळींनी जरी आपल्या धर्मजीवनासाठी लॅटिन भाषा स्वीकारली तरी त्यांच्यापैकी काहींनी (प्रॉटेस्टंट मंडळींनी) त्यासाठी स्वभाषा वापरणे पसंत केले. इंग्लिश किंवा फ्रेंच किंवा जर्मन विचारवंत जरी एकमेकांचे विचार मुळातून किंवा अनुवादामार्फत नित्य समजावून घेत असले आणि ते एकाच पाश्चात्त्य विचारधारेत समाविष्ट असले तरी आपापल्या भाषांचे त्यांच्या विचारपद्धतीवर खोलवर परिणाम झालेले दिसतात. इंग्रजीचे पाय सहसा व्यावहारिक सारासार विचारांच्या भूमीला सोडत नाहीत, फ्रेंच आखीवरेखीव, सुस्पष्ट, आणि तार्किक मांडणीला जपत राहते, तर जर्मन अमूर्त संकल्पनांची गुंतागुंतीची व्यूहरचना करण्यात रमते. मध्ययुगीन भारतात वैचारिक जीवन संस्कृत किंवा फार्सी या अभिजात भाषांमधून आणि काव्यजीवन देशी भाषांमधून अशी

फाळणी पत्करली गेली खरी, पण त्यामुळे या दोन्हीवर मर्यादा पडल्या आणि या मर्यादांमधून आपण अजूनही मुक्त झालेलो नाही. अर्वाचीन काळात भारतीयांचे वैचारिक गद्य इंग्रजीत तरी असते किंवा संस्कृताळलेल्या देशी भाषेत इंग्रजीचा छुपा अनुवाद तरी करीत राहते. याला काही मोठी सुधारणा म्हणता येणार नाही.

काव्यात्म, आध्यात्मिक, वैचारिक सर्जनशीलतेचे माध्यम म्हणून भाषा कार्य करते, आणि जिने शैशवापासून आपली सोबत केली आहे त्या स्वभाषेत ही सर्जनशीलता विशेष फुलते. असे का होते? भाषा ही केवळ विचार, भावना, इच्छा एकमेकाला कळवण्याचे म्हणजे परस्पर-संवादाचे किंवा विसंवादाचे संज्ञापन साधन (मीन्ज ऑफ कम्युनिकेशन) आहे हे तर खरेच. पण भाषा आणखीही काही आहे. आपले मनोगत आपले आपल्याला कळवून घेण्याचे आणि आपल्या आकलनाला आकार देण्याचे कामही ती करते, म्हणजेच भाषा ही एक ज्ञान माध्यम (मीडियम ऑफ कॉग्निशन) सुद्धा आहे. आपला आपल्याशी अखंड संवाद किंवा विसंवाद चालेला असतो. पुष्कळदा तो मनातल्या मनात चालतो खरा; पण तोही बऱ्याच अंशी भाषेतूनच.

भाषेचे संज्ञापनाच्या अंगाने जागतिकीकरण होताना केंद्रीकरणाला त्यातल्या त्यात अधिक महत्त्व येते. संपर्क भाषेचे कार्य यासाठीच चालते. परंतु भाषेचे ज्ञान-माध्यम म्हणून जागतिकीकरण होताना विकेंद्रीकरणाला त्यातल्या त्यात अधिक महत्त्व येते. अभिव्यक्ती स्वभाषेत करून अनुवादामार्फत जागतिकीकरणाच्या क्रियेत या दोन प्रेरणांचा मेळ सुयोग्य रीतीने घालण्यात सर्वांचे हित आहे. कोणत्याही टोकाला जाण्यात कुणाचेच हित नाही, उलट हानीच आहे.

### जागतिकीकरणाची भाषा

जागतिकीकरणाची भाषा कुणी, कुठे, केव्हा, कशासाठी पहिल्यांदा केली? 'जागतिकीकरण' शब्दाचा तोंडवळा संस्कृत असला तरी तो 'ग्लोबलायझेशन' या इंग्रजी शब्दासाठी मराठीने बनवलेला प्रतिशब्द आहे. (हिंदीमध्ये 'वैश्विकीकरण' शब्द यासाठी वापरतात.) मूळ इंग्रजी शब्दाचा उपयोग प्रथम व्यापारउद्योगाच्या क्षेत्रात केला गेला. उद्योजकाने माल बनवायचा, देशातल्या देशात तो खपेलच, उरेल तो परदेशात नेऊन विकायचा ही कल्पना एकोणिसाव्या शतकात पक्की रुजली. कारणे दोन. एक तर औद्योगिक क्रांतीमुळे मालाचे उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊ लागले, दुसरे म्हणजे

युरोपियन देशांना कच्चा माल पुरवणारे आणि पक्का माल घेणारे अंकित देश लाभले. दुसऱ्या महायुद्धानंतर युद्धात दुबळे झालेले देश, युरोप आणि जपान, सावरले आणि अमेरिकेच्या बरोबरीने साधारणत: १९८० पासून आपल्या मालाला परदेशात बाजारपेठ शोधू लागले. दळणवळणाची साधने वाढली. जगातला मोठा भाग अविकसित, फार तर विकसनशील राहिलेला. या सगळ्यामुळे परदेशनिर्यातीला जागतिक व्यापाराचे स्वरूप आले. स्वदेशातली गरज भागवून उरलेला माल निर्यात करायचा एवढीच मर्यादित दृष्टी राहिली नाही, तर परदेशांची ती ती स्थानिक गरज लक्षात घेऊन आपण तिला अनुरूप माल बनवायचा ही नवी दृष्टी आली. म्हणजे केवळ व्यापारच जागतिक राहिला नाही तर उद्योगही जागतिक झाला. स्थानिक गरजा आणि जागतिक उत्पादन यांचा मेळ घालण्यात प्रथम जपानने आघाडी मारली, आणि युरोप-अमेरिका खडबडून जागे झाले. या मेळ घालण्याला जपानी भाषेत 'दोचाकुका' म्हणतात, इंग्रजी प्रतिशब्द 'ग्लोबल लोकलायझेशन' (व्यवस्थापन प्रशिक्षणाचे स्तोम माजले तेही याच सुमारास.) याच्या उलटही प्रकार सुरू झाला. स्थानिक गरजेला अनुरूप परदेशी माल बनवायचा याच्या ऐवजी परदेशी मालाला अनुरूप स्थानिक गरजा बनत जायच्या असेही होऊ लागले. केवळ अविकसित किंवा विकसनशील देशातच ्व्हे तर जपान, युरोपमध्येही असे होऊ लागले. हॉलिवुडच्या चित्रपटांमुळे स्थानिक चित्रपट माघार घेऊ लागले किंवा स्वत:ला बदलून घेऊ लागले. इतरही क्षेत्रांमधून हे लोण पसरले. थोडक्यात सांगायचे तर जागतिकीकरणाची भाषा आर्थिक किंवा तांत्रिक क्षेत्रांपुरती राहिली नाही, तिला राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक पदरही लाभले.

मानवजातीच्या इतिहासात हे स्थित्यंतर मोठे तर खरेच, पण ते काही गेल्या दहावीस वर्षांत अचानक घडले असे नाही. माणसामध्ये फार पूर्वीपासून असलेल्या जागतिकीकरणाच्या ओढीला व्यापारउद्योगामुळे फार मोठे बळ लाभले आहे एवढेच. माणसाच्या इतिहासात ज्या ठिकाणी ज्या ज्या काळी उद्योग, व्यापार, राजकारण, समाजव्यवहार, आणि संस्कृती एका प्रगल्भ आणि परिपक्व अवस्थेला पोचली त्या त्या ठिकाणी त्या त्या वेळी माणसाची नजर केवळ स्वकीय, स्वदेश, स्वविद्या, स्वधर्म, स्वभाषा यांच्यात न घोटाळता परकीय, परदेश, परविद्या, परधर्म, परभाषा यांच्यापर्यंत जाऊन फाकली, तुलना करू लागली, देवघेवीचा विचार करू लागली, पहिली साम्राज्ये (चीन, प्राचीन इराण, रोम), पहिले जागतिक प्रसाराची आकांक्षा धरणारे धर्म (बौद्ध,

ख्रिस्ती, इस्लामी), पहिले वैचारिक आणि ललित स्वरूपाचे अभिजात वाङ्मय (संस्कृत, ग्रीक, लॅटिन, चिनी, अरबी, फार्सी), पहिल्या जागतिक भाषा (फ्रेंच, इंग्रजी, स्पॅनिश), पहिल्या जागतिक चळवळी (आधुनिक विज्ञान तंत्रज्ञान, आधुनिक सार्वजनिक शिक्षण, कामगार चळवळ), पहिली जागतिक प्रसारमाध्यमे (मुद्रण, टपाल, तार, विविध बिनतारी साधने) आणि पहिली जागतिक कला (चित्रपट) ह्या सगळ्या जागतिकीकरणाच्याच पाऊलखुणा आहेत हे स्पष्ट उमजल्याशिवाय जागतिकीकरणाचे खरेखरे स्वरूप, त्यातून मिळणाऱ्या संधी आणि टाळायचे धोके लक्षात येणार नाहीत.

आपला खंडप्राय भारत देश या ऐतिहासिक प्रक्रियेला अपवाद नाही. भारतामधल्या विविधतेबद्दल म्हणा, आपण रास्त अभिमान बाळगतो. त्याच्या बुडाशी आपली 'जगा आणि जगू द्या' ही भाषा आहे आणि ती जागतिकीकरणाला अनुकूल अशीच भाषा आहे. छोट्या जमातीच्या किंवा प्रदेशाच्या काहीशा एकसुरी जीवनपद्धतीकडून मोठ्या समावेशक अनेकसुरी जीवनपद्धतीकडे आणि सांस्कृतिक वारशाकडे पाऊल टाकणे त्यामुळे सोपे झाले. भारताच्या इतिहासातल्या अभिजात प्राचीन काळात (ढोबळ मानाने इ.स.पू. ६०० ते इ. स. ६००) भारत बाहेरच्या जगाशी संपर्क ठेवून होता. व्यापारी आयातनिर्यातीच्या बरोबरीने सामाजिक-सांस्कृतिक स्वरूपाची निर्यात (बौद्धधर्म, आयुर्वेद) किंवा आयात (राशिचक्र, मूर्तिकलेतही गांधारशैली) करायला उत्सुक होता. मात्र या काळाच्या शेवटीशेवटी विविध कारणांमुळे ही निकोप स्थिती राहिली नाही. एका कर्मदरिद्री भीतीने भारताला ग्रासले. परकीय, परदेश, परविद्या, परधर्म, परभाषा यांना चार हात दूर ठेवण्याची आणि स्वतःला कोंडून घेण्याची भाषा चालू झाली. अर्थातच पुढे बाहेरचे जगच भारतावर अरबी, अपगाणी, तुर्की आक्रमणांच्या आणि युरोपीय आक्रमणांच्या रूपाने येऊन आदळले. बाहेरच्या जगाला हिंमतीने, राजीखुषीने, अक्कलहुशारीने सामोरे जाणे वेगळे आणि अगतिकतेने, नाखुषीने, शहाणपण गुंडाळून शरण जाणे वेगळे. नायपॉलच्या शब्दांत भारतीयांचा हा उत्तरकालीन इतिहास एका 'वूंडेड सिव्हिलिझेशन'चा, एकाच घायाळ महासंस्कृतीचा इतिहास आहे. परकी माणसे, देश, विद्या, धर्म, भाषा समोर आल्या की भारतीय माणसाचे नैसर्गिक कुतूहल किंवा बौद्धिक जिज्ञासा जागृत होत नाही. सामान्यतः भारतीय माणूस परकी गोष्टींचा एक तर लाचारीने किंवा भाबडेपणाने स्वीकार तरी करीत आला आहे किंवा हेकटपणाने किंवा आंधळेपणाने तिरस्कार तरी करीत आला आहे. हे दोन्ही टोकाचे प्रतिसाद एकाच घायाळ मनोभूमिकेचे आणि त्या घायाळपणातून आलेल्या न्यूनभावाचे आविष्कार आहेत. तो

न्यूनभाव उघड आहे की छुपा आहे एवढाच काय तो फरक! (न्यूनभाव छुपा असला तर मनोवैज्ञानिक त्याला न्यूनगंड म्हणतात.) उघड स्वीकार करणारा न्यूनभाव असो किंवा छुपा राहून परक्याचा तिरस्कार करणारा न्यूनभाव असो, परिणाम एकच. घायाळ मनोभूमिकेत असणाऱ्या भारतीयांना जे परकीय आहे ते तटस्थपणे जोखता येत नाही, त्याचे वस्तुनिष्ठपणे मूल्यमापन करता येत नाही. आजही या दोन्ही प्रकारच्या न्यूनभावाचे नमुने भारतात विपुल प्रमाणात दिसतात. आजच्या भारतीयांनी आजच्या या जागतिकीकरणाच्या स्थित्यंतराला सामोरे जायचे तर या भयाकुल मन:स्थितीपोटी नव्हे. आर्थिक, राजकीय, सामाजिक, वैचारिक, सांस्कृतिक सर्वच प्रकारच्या आयातीला आणि निर्यातीलाही आपण उत्सुक आणि म्हणून सज्ज झाले पाहिजे. नाहीपेक्षा आपण अर्वाचीन युगात आलोच नाही. उत्तर-मध्ययुगातच अडकून बसलो आहोत असे होईल. पाश्चात्त्य जगाला धास्तावलेली किंवा दिपलेली भारतीय मंडळी अशी अडकून पडलेली मंडळी आहेत.

जागतिकीकरणाची भाषा आपण अवश्य करावी, पण तिचे व्याकरण आपण डोळसपणे आणि हिंमत न हरवता बदलून घ्यायला पाहिजे. जागतिकीकरण हे प्रकरण सर्वस्वी हितकारक नाही किंवा सर्वस्वी हानिकारक नाही. ती क्रिया सर्वस्वी आपोआप आणि अटळपणे घडणारी नाही किंवा सर्वस्वी माणसाच्या निर्णयावर अवलंबून असणारी नाही. तिच्यात आपण घेवाण करणार आहोत तशी देवाणही करणार आहोत. (नुसतीच घेवाण करणार असलो तर जागतिकीकरण म्हणजे केवळ पाश्चात्त्यीकरणाला, किंबहुना अमेरिकीकरणाला, दिलेले गोंडस नाव ठरेल!) जागतिकीकरण ही वास्तविक पाहता देवाणघेवाणीची आणि म्हणून विविधतेला वाव देणारी क्रिया आहे हे आपण सिद्ध करायचे आहे. मनुष्यजातीच्या इतिहासातले हे स्थित्यंतर जेवढे केंद्रीकरणाकडे झुकते तेवढे विकेंद्रीकरणाकडे झुकते हे आपल्याला दाखवून द्यायचे आहे.

''हें विश्वाचें आंगण आम्हां दिले आहे आंदण!'' गांधीजींच्या शब्दांत सांगायचे तर 'लोकांनी बांधलेल्या घरांमध्ये आगंतुक चोरट्यागत, भिकारी किंवा गुलाम असल्यागत राहायचे याला आपला ठाम नकार आहे.'

**७, धनंजय**

**७५९/८३, भांडारकर रस्ता,**

**पुणे - ४११००४.**

■■■

# इंग्रजी -केव्हा ? किती ? कसं ?

नीती बडवे

पहिलीपासून इंग्रजी शिकवावं का नाही? त्याचे फायदे काय आणि तोटे काय? या प्रश्नांचा विचार करताना लहान गावं, खेडी किंवा वस्त्यांमध्ये असलेल्या शाळा आणि तिथे शिकणारी मुलं यांचा प्रामुख्याने विचार व्हायला हवा. शहरातल्या मुलांना इंग्रजीसाठी अनेक पर्याय उपलब्ध असतात आणि त्यांचा इंग्रजीशी अनेक मार्गांनी संपर्क येत असतो.

'पहिलीपासून इंग्रजी' या नवीन धोरणाचा विचार उद्देश, वय, कालावधी, मुलांची संख्या आणि शिक्षकांचं प्रशिक्षण, शिकणाऱ्याची प्रेरणा, साधनसामग्री, आत्मविश्वास अशा मुद्द्यांना धरून होणं आवश्यक आहे.

## १ उद्देश

महाराष्ट्र सरकारनं 'शासन निर्णय क्र. सुप्राअ १०९९ : १८० /९९ प्राशि-५, दिनांक ३० डिसेंबर १९९९' द्वारे या धोरणामागचा उद्देश निश्चित केला आहे : ''एकविसाव्या शतकात प्रवेश करताना प्रत्येक विद्यार्थ्याला मातृभाषेतून शिक्षण मिळाले पाहिजे, त्याने राष्ट्रभाषा अवगत केली पाहिजे आणि ज्ञानभाषा म्हणजेच इंग्रजी भाषाही शिकली पाहिजे. (...) इंग्रजी भाषेला आज सर्वत्र असलेले महत्त्व व प्रामुख्याने या भाषेची उपयुक्तता लक्षात घेऊन इंग्रजी भाषा हा विषय इयत्ता पहिलीपासून सुरू केल्यास विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी इंग्रजी अत्यंत उपयोगी ठरेल. त्यामुळे मातृभाषेतून शिक्षण देण्याच्या शैक्षणिक धोरणाला बाधा न येता व मातृभाषेबद्दलचा स्वाभिमान जागृत ठेवून इयत्ता पहिलीपासून इंग्रजी हा केवळ एक विषय म्हणून शिकवणे आवश्यक झाले आहे.''

म्हणजेच इंग्रजी ही ज्ञानभाषा म्हणून उच्च शिक्षणासाठी अवगत व्हावी आणि ती पहिलीपासून केवळ एक विषय म्हणून शिकवण्यात यावी असे धोरण दिसते.

## २ परभाषा शिकण्यात वयाचा भाग

पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागात जर्मन, फ्रेंच, रशियन, जपानी, स्पॅनिश या भाषा शिकण्यासाठी दहावीनंतर प्रवेश दिला जातो. इतर विद्यापीठांमधूनही तरुण आणि प्रौढ लोक परभाषा शिकत असतात. तसंच मॅक्स म्युलर भवन, अलियाँस

फ्रॅंसेज, किंवा इंडोजपानी फाउंडेशनतर्फे चालणाऱ्या वर्गातही तरुण लोक या भाषा शिकतात. इथे वयाची अडचण जाणवत नाही. उलट परिपक्वतेचा फायदाच जाणवतो.

एक परभाषा औपचारिकरीत्या, तासिकांच्या चौकटीत, बंद वर्गात शिकवली जाते तेव्हा ती समजून घेऊन शिकावी लागते. म्हणून तिथे वाढत्या वयाचा फायदा मिळतो. मुलांपेक्षा मोठ्यांना भाषाविशेष लवकर लक्षात येतात आणि भाषा रचनांचं अनुकरण आणि उपयोजन जास्त लवकर करता येतं. म्हणून 'भाषा केव्हा शिकावी' या प्रश्नाचं उत्तर 'केव्हाही शिकावी' असंच द्यावं लागेल.

सभोवतीच्या वातावरणातून, वापर-व्यवहारातून, अनुकरणानं लहान मूल स्वभाषा शिकतं त्या प्रक्रियेत आणि शाळेत एक विषय म्हणून परभाषा शिकण्याच्या प्रक्रियेत जमीन-अस्मानाचं अंतर आहे.

म्हणून 'लहान मुलं भाषा लवकर शिकतात' हे विधान धोरणाविषयीच्या चर्चेत संदर्भबाह्य ठरतं.

### ३ कालावधी

इतर परकीय भाषा तरुण किंवा प्रौढ वयात आणि ठराविक कालावधीत आत्मसात करता येतात. इंग्रजी तर आपल्या सर्वांना निदान काही अंशी परिचित असते आणि ठायी ठायी आपल्याला भेटते, सभोवतीच्या वातावरणात जाणवते. त्यामुळे इंग्रजी भाषा शिकणं आपल्याला नक्कीच जास्त सोपं वाटायला पाहिजे. तरी मग तिचाच एवढा बाऊ का पडतो? जगाची प्रगती आज कार्यक्षमता वाढवण्याच्या आणि वेळ वाचवण्याच्या दिशेनं चाललेली दिसते. थोड्या दिवसांत भरगच्च कार्यक्रम देणारे परभाषांचे वर्ग चालतात. इंग्रजीमधली कौशल्यं कमी कष्टात आणि कमी वेळात कशी आत्मसात करता येतील याचा विचार करण्याऐवजी आपण इंग्रजी शिकण्याचा काळ तीनवरून सहावर आणि सहावरून दहा वर्षांपर्यंत वाढवण्याच्या खटाटोपात आहोत. हे करत असताना कस, कार्यक्षमता, परिणामकारकता यांचा मात्र विसर पडतो.

ज्यांना इंग्रजीमधली ज्ञानार्जनासाठी किंवा उच्चशिक्षणासाठी आवश्यक तेवढीच कौशल्यं मिळवायची असतील त्यांच्यासाठी दहावी, अकरावी, बारावीत दीर्घ सुट्यांमधे दोन-दोन महिन्यांचे भरगच्च कार्यक्रम असलेले अभ्यासक्रम असावेत.

इंग्रजी ही निश्चित उद्दिष्टासाठी, म्हणजे ज्ञानभाषा म्हणून, नक्कीच थोड्या वर्षांत शिकता यायला पाहिजे. पण हे उद्दिष्ट निश्चित करून त्याच्याशी विसंगत अशा



अनुक्रमणिका

धोरणाचा आग्रहपूर्वक पाठपुरावा केला जात आहे.

**४. मुलांची संख्या आणि शिक्षकांचं प्रशिक्षण**

पहिलीमध्ये शाळेत येणाऱ्या मुलांची संख्या सर्वांत जास्त असते. वरच्या वर्गांत ती कमी होत जाते. प्रा. पु.ग. वैद्यांच्या म्हणण्याप्रमाणे (साधना, १५ जाने २०००) पहिलीत दाखल झालेल्या मुलांपैकी १५% मुलं दहावीच्या वर्गात पोचतात. दहावीचा निकाल ५०% च्या आसपास लागतो. पास झालेल्यांपैकी ४०% विद्यार्थी शास्त्र आणि तांत्रिकी विषयांकडे वळतात. असे विद्यार्थी पहिलीत दाखल झालेल्या विद्यार्थ्यांच्या केवळ ४% असतात. या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी इंग्रजीची गरज असते.

परंतु पहिलीत इंग्रजी सक्तीचं केल्यानं ते शिकवण्यासाठी जास्तीतजास्त शिक्षकांची गरज आहे. इंग्रजी शिकण्याची वर्षे वाढवून आणि शिक्षकांच्या प्रशिक्षणाचा बोजा वाढवून लहानात लहान गावात लहानात लहान मुलाला इंग्रजी सहज अवगत होऊ शकेल असं समजणं म्हणजे स्वत:ची आणि दुसऱ्यांची फसवणूकच आहे.

**५. स्वभाषा आणि इंग्रजी**

इंग्रजी कोणत्याही उद्देशासाठी शिकवली जात असली तरी स्वभाषा आणि इंग्रजी शिकवण्याची सुरुवात एकदम करणं श्रेयस्कर नाही. त्यातून मुलांचा आत्मविश्वासही वाढणार नाही.

युरोपातही इंग्रजीचं वाढतं महत्त्व मान्य केलं जात आहे. तरीही तिथे इंग्रजी शिकण्याची सुरुवात पाचवी इयत्तेपासूनच केली जाते. मातृभाषेबरोबरच इंग्रजीही शिकवण्यास सुरुवात करू या असं कोणी म्हणताना दिसत नाही.

घरीदारी आपल्या बोलीमध्ये व्यवहार करण्याची ज्या मुलांना सवय आहे त्यांना पहिलीपासून प्रमाण मराठी शिकवू नये यासाठी प्रयत्न चालू आहेत. अशा मुलांसाठी पहिलीदुसरीचे अभ्यासक्रम त्यांच्या बोलीमध्ये तयार केले जावेत आणि प्रमाण मराठीची सुरुवात उशिरा व्हावी या धोरणाचा पुरस्कार केला जात आहे. अशा वेळी प्रमाण मराठी हीच एक परभाषा ठरते. तिथे इंग्रजी मात्र पहिलीपासून शिकवण्याचे धोरण राबवणं किती व्यवहार्य ठरेल?

**६ आत्मविश्वास**

खरं म्हणजे इंग्रजीचं धोरण राबवलं जात आहे ते इंग्रजीचं केवळ ज्ञानार्जनाशी

नातं जोडण्यासाठी नाही तर इंग्रजीची निरगाठ प्रतिष्ठा आणि आत्मविश्वास यांच्याशी पडली आहे म्हणून.

**७. इंग्रजीची अनौपचारिक ओळख**

लहान मुलांनी इंग्रजी आत्मसात करावं, त्यांना इंग्रजी बोलता यावं, त्यांचा आत्मविश्वास वाढावा, ही उद्दिष्टं साकार करायची असतील तर इंग्रजीसाठी अनौपचारिक वातावरण निर्माण करणं आवश्यक आहे. स्वभाषेप्रमाणे इंग्रजी सहज कसं कानावर पडेल याचा विचार व्हावा. (नाहीतरी आजचं युग हे 'सिम्युलेशन' आणि 'व्हर्च्युअल रिॲलिटी' चंच आहे!) यासाठी विशेषत: श्राव्य माध्यमाचा अत्यंत **व्यापक** आणि **प्रभावी** उपयोग करून घेता येईल. याचे उघड फायदे असे :

- लहानात लहान वस्तीमध्येही कॅसेट रेकॉर्डर आणि ध्वनिफिती पुरवणं कमी खर्चाचं आणि सहज शक्य आहे.
- कॅसेटच्या माध्यमामुळे किंवा ध्वनिफितींमुळे शिक्षकांवरचं ओझं आणि दडपण एकदम खूपच कमी होईल.
- शिक्षकांचं प्रशिक्षण सुलभपणे आणि थोड्या कालावधीत करता येईल.
- ध्वनिफितींमुळे मुलांना चांगले उच्चार ऐकायला मिळतील.
- मुलांच्या इंग्रजीच्या दर्जाची सांगड निव्वळ एकट्या शिक्षकाशी घातली जाणार नाही. त्यांना इतर संपर्क-संदर्भ मिळतील.
- ध्वनिफितींवर गाणी, गोष्टी, गमती असतील तर अशा ध्वनिफिती हस्तव्यवसाय, व्यायाम, खेळ चालू असताना किंवा सुटीच्या वेळातही लावता येतील. म्हणजेच त्यांच्यासाठी खूप जास्त तासिका निर्माण करण्याची आवश्यकता पडणार नाही.
- मुलांसाठी अशा ध्वनिफिती आणि केवळ शिक्षकांसाठीच छापील हस्तपुस्तिका तयार करणं कमी त्रासाचं आणि कमी खर्चाचं ठरेल.

असे अभ्यासक्रम तयार करताना खालील मुद्द्यांचा विचार व्हावा :

१. कॅसेटवरचं इंग्रजी भारतीय इंग्रजी असावं.
२. त्याचे उच्चार देवनागरीत देण्याचं शक्यतो टाळावं.
३. एकूण पाठ्य आणि शब्दसंग्रह अत्यंत मर्यादित असावा.
४. त्यांची खूपदा उजळणी केली जावी.

५. एका भाषेची ओळख झाल्यावर इंग्रजीची केवळ 'स्वर ओळख' व्हावी. तोंड ओळख नव्हे.

६. पहिली दोन वर्षं केवळ श्रवण-कौशल्यावर भर द्यावा. एवढ्या व्यापक प्रमाणावर भाषा शिकवताना उच्चारांचा आणि स्वरांचा सराव कानांना होणं अत्यंत आवश्यक आहे.

७. चौथा-पाचवीच्या मुलांसाठी दृश्य स्वरूपातील सामग्री म्हणून फक्त चित्रांचे तक्ते उपलब्ध करून द्यावेत.

८. कोणत्याही तऱ्हेच्या छापील पुस्तकरूपातील सामग्रीचा तिसरी, चौथी, पाचवीपर्यंत आग्रह धरू नये.

९. पाचवीपर्यंत श्राव्य माध्यमांना जास्तीत जास्त महत्त्व दिलं जावं. अक्षरओळख करून दिली जाऊ नये.

१०. सहावीत अक्षर ओळख शब्द ओळखण्यातून करून दिली जावी.

११. सातवीपर्यंतचा अभ्यासक्रम पाठ्यपुस्तकांऐवजी पाठ्यध्वनिफितींवर असावा.

१२. सातवीपर्यंत वर्गातल्या सहभागावर प्रगती जोखावी. कोणत्याही प्रकारची परीक्षा, चाचणी वर्षाअखेर नसावी.

१३. काही मर्यादित प्रश्न, प्रसंग यांची ओळख करून देऊन भाषिक प्रतिक्रिया पक्क्या करून घ्याव्यात.

१४. दहावीपर्यंत पाया शब्दसंग्रह मर्यादित ठेवून केवळ मूळ वाक्यरचना पक्क्या करून घ्याव्यात. मोठे धडे किंवा अवघड कविता यांवर शक्यतो भर नसावा.

१५. असा पाया पक्का असेल तर अभ्यासाच्या क्षेत्रानुसार शब्दसंग्रह वाढवणं सोपं जाईल.

या संदर्भात इंग्रजीचा विचार करताना मागास भागातल्या, लहान गावात हे धोरण राबवणं व्यवहार्य ठरेल असा आणि हे एवढाच अभ्यासक्रम निश्चित करावा.

**५, संयोगिता,८९७ शिवाजीनगर,**
**पुणे - ४११००४ दूरध्वनी : ५६५८३८८**

■■■





अनुक्रमणिका

# इंग्रजी कोणत्या वयापासून ?

**लेखक - परमेश आचार्य**
**भाषांतर संजीवनी कुलकर्णी**

*( शिक्षणात नवचैतन्य आणण्याचा प्रयत्न करणारी 'एकलव्य' ही मध्यप्रदेशातील संस्था आहे. या संस्थेतर्फे 'स्रोत' नावाचं विज्ञानतंत्रज्ञानासंदर्भातून सामाजिक प्रश्नांचा ऊहापोह करणारं एक नियतकालिक निघतं. ऑक्टोबर- १९९९ च्या 'स्रोत' मध्ये श्री. परमेश आचार्य या शिक्षण अभ्यासकांचा एक लेख आहे. हा लेख पश्चिम बंगालमधल्या स्थितीबद्दलचा आहे, परंतु मूळ मुद्दा आपल्यासाठीही योग्यच आहे. पहिलीपासून इंग्रजी शिकवण्याच्या नुकत्याच झालेल्या निर्णयाबद्दल या लेखकानं म्हटलं ते सर्वांनाच लागू पडणारं आहे.)*

*प्राथमिक शिक्षणामध्येच दुसरी भाषा (इंग्रजी) शिकवली जावी ह्या बाजूचे मुद्दे.*

१. जैविक -तंत्रशास्त्राच्या अभ्यासानुसार बालवयातच भाषा शिकण्याची क्षमता कमी कमी होत जाते आणि प्रौढवयात तर ती जवळजवळ संपतेच. या दृष्टीने १० वर्षांच्या आधीचा काळ हा भाषा- शिक्षणाच्या दृष्टीनं सर्वांत योग्य आहे, त्यामुळे प्राथमिक शिक्षणातच इंग्रजी भाषेचा अंतर्भाव करणं योग्य आहे.

२. जितकं लवकर शिकवावं तेवढा जास्त वेळ मुलाला शिक्षणकाळात ही नवी भाषा शिकण्यासाठी मिळेल. उच्चशिक्षणासाठी इंग्रजीची चांगली जाण येणं आवश्यक असतं, या दृष्टीनं प्राथमिक शिक्षणातच इंग्रजी शिकवायला सुरुवात होणं आवश्यक आहे.

३. चौथीनंतर शाळा गळतीचं प्रमाण मोठं आहे, त्यामुळे रोजच्या जीवनात जेवढं कामचलाऊ इंग्रजी लागतं, उदाहरणार्थ बसचा नंबर, रेल्वेच्या वेळापत्रकांतील ठिकाणांची नावं, तिकिटांचे पैसे, दुकानांची नावं इत्यादी वाचण्यासाठी इंग्रजी यावं लागतं, तेवढं इंग्रजी प्राथमिक पातळीवरच शिकवलं गेलं तर अधिक बरं.

४. इंग्रजी माध्यमाच्या शाळेत शिकलेल्या मुलांच्या तुलनेत ५ वी पासून इंग्रजी शिकणारी मुलं मागे पडतात. आजच्या स्पर्धात्मक जगामध्ये मातृभाषेतून शिक्षण घेणारी मुलं आणि इंग्रजी माध्यमातली मुलं यांच्यात अंतर पडत जातं.

५. इंग्रजीला आज विश्वभाषेचं स्थान तर आहेच, शिवाय ते विज्ञान, तंत्रज्ञान आणि व्यापक संवादाचं माध्यमही आहे. परिस्थितीशी जुळवून घेऊन पुढे जाण्यासाठी

इंग्रजी भाषेवर प्रभुत्व असणं अत्यावश्यक आहे, त्यासाठी सुरुवातीपासूनच इंग्रजी शिकण्याला पर्याय नाही.

६. सर्वसामान्य जनतेचा कौल लक्षात घेता प्राथमिक पातळीवरच इंग्रजीही शिकवायला हवं, हाच जनमताचा कौल आहे.

**प्राथमिक स्तरावर दुसरी भाषा-इंग्रजी शिकवली जाण्याच्या विरोधातील तार्किक विचार.**

१. आजवरचा जगातला अनुभव लक्षात घेता जैविक-तंत्रशास्त्राचा निष्कर्ष प्रत्येक वेळी वास्तवाशी जुळणाराच निघतो असं दिसत नाही. वय वाढतं तशी भाषा शिकण्याची क्षमता कमी कमी होते आणि पुढे संपून जाते ही गोष्ट उदाहरणांनी सहज खोटी ठरवता येईल.

प्रौढांमध्ये भाषा शिकण्याची क्षमता जर नसती किंवा नगण्य असती तर देशभरातील प्रौढ साक्षरता अभियान निरर्थकच ठरलं असतं. याशिवाय अनेक प्रयोगांच्या आधारे दुसरी भाषा वयाच्या ११व्या वर्षी शिकायला सुरुवात करून त्यांत प्रावीण्य मिळवता येतं हे सिद्ध झालेलं आहे. स्वीडनमध्ये १९५८ साली झालेल्या प्रयोगाबद्दल युनेस्कोच्या अहवालात[१] म्हटलं आहे, ''प्रयोगाच्या शेवटी विद्यार्थ्यांचं मूल्यमापन अगदी काटेकोरपणे केलं गेलं, आणि काही अनपेक्षित निष्कर्ष निघाले. मुलांचं वय जितकं जास्त तेवढी ती मुलं नेमके शब्दोच्चार आणि विचारपूर्वक शब्दांचा वापर करताना आढळली. ११ वर्षांच्या मुलांचा नवी भाषा शिकण्यातला वेग ७ वर्षांच्या मुलांच्या तुलनेत निश्चितच जास्त होता.

अशा आणखीही काही प्रयोगांच उदाहरण देता येईल. 'द एज फॅक्टर इन सेकंड लँग्वेज ॲक्विझिशन[२]' : दुसरी भाषा आत्मसात करण्यातला 'वया' चा मुद्दा, या पुस्तकातल्या शेवटच्या प्रकरणात संपादकांनी अनेक अभ्यासांच्या विश्लेषणाचा एकत्र विचार करताना म्हटलंय, ''भाषा शिक्षणात वयामुळं काही आडकाठी येते असं फारसं दिसत नाही.''

आणखी एका लेखात किशोरवयानंतर इंग्रजी शिकू लागणाऱ्या डच विद्यार्थ्यांचं इंग्रजी इतकं चांगलं होतं की ती व्यक्ती समोर नसताना नुसता आवाज ऐकून वाटे की ह्यांची मातृभाषा इंग्रजीच असावी. यासंदर्भात श्रीमती फुएन टेविला यांचं मत आहे की, केव्हाही सुरू केलं तरी ५ ते ७ वर्षांत नवीन भाषा शिकता येतेच.

२. भाषा शिकण्यासाठी कमीत कमी व जास्तीत जास्त वय किती असावं, याबद्दलही मतभेद आहेत. जितकं लवकर तितकं बरं या मताचे जनक 'विल्डर पेनफिल्ड'

यांच्या पुस्तकाबद्दलच्या समीक्षेत म्हटलं आहे की संशोधनातून सापडलेले निष्कर्ष मूळ अपेक्षेशी जुळताना दिसत नाहीत. काहींनी पेनफिल्ड यांच्या मताचं समर्थन केलंय तर काहींनी त्याचं खण्डनही केलेलं आहे. याचा अर्थ अजून यामध्ये निश्चित काय, हे स्पष्ट झालेलं नाही. हा वादाचाच मुद्दा अजून तरी आहे.

३. प्रत्यक्षात बालवयात भाषा शिकणं आणि प्रौढवयात भाषा शिकणं यांत फरक आहे. बालवयात ऐकण्यावर, अनेकदा म्हणण्यावर, पाठांतरावर जोर देऊन शिकता येतं. तर ११व्या वर्षानंतर, नुसतं लक्षात ठेवून, पाठांतर करून भाषा शिक्षण होत नाही तर विचार करून, स्वतःची कल्पना, समज यांचा वापर करून भाषा शिकता येते. शाळेत भाषा शिकवताना दुसऱ्या पद्धतीनंच शिकवायला हवी. या पद्धतीनं भाषाशिक्षणातूनच दृष्टिकोण विस्तारण्याची शक्यता निर्माण होते. हे भाषाशिक्षण माणसात चिंतनाची, स्वतःला पारखण्याची क्षमता आणू शकतं.

४. बालवयात दोनदोन भाषांत शिक्षण होऊनही प्रत्यक्षात एकाच भाषेत रोजचे व्यवहार करू शकणारे, उदाहरण हवं असेल तर अमेरिकाभर भरपूर आहेत.

अगदी आपल्याकडेही इंग्रजी माध्यमात शिकलेल्या अनेकांना दुसरी भाषा म्हणून शिकलेली मातृभाषा येईनाशी होते. यावर आपण करायचं काय ? इंग्रजीची ही दादागिरीच योग्य मानून आपली भाषा दुय्यम ठरवून टाकणं स्वीकारायचं? की भारतीय भाषांचा विकास होण्यासाठी प्रयत्न करायचे, सर्व प्रकारच्या व्यवहारात त्यांचा वापर कसा करता येईल हे पाहायचं ? हा निर्णय निश्चितपणे शासनपातळीवरही व्हायलाच हवा. १९९२ साली न्यूयॉर्क टाईम्स मध्ये रेजिस डेब्रे आणि युजिन आयनेस्को यांच्या समवेत फ्रान्सच्या ३०० उच्चशिक्षितांनी जगभर पसरलेल्या इंग्रजीच्या कचाट्यातून फ्रेंच भाषेला वाचवण्याचं आवाहन केलेलं होतं. आपण यातून काही शिकणार का ?

५. लवकरात लवकर सुरुवात केली की भाषशिक्षण उत्तम होतं आणि उशिरा सुरुवात केली की तेवढं चांगलं साधत नाही, हे काही पुरेसं सिद्ध झालेलं नाही. त्यामुळे तो मुद्दा तूर्त थोडा बाजूला ठेवला तर अयोग्य शिक्षकांच्या सोबत अत्यंत प्रतिकूल शैक्षणिक वातावरणात परभाषा शिकण्याची जबरदस्ती मुलांवर केली गेली तर त्याचे तोटेच होण्याची शक्यता जास्त आहे. सुरुवातीचीच बैठक कच्ची राहिली तर पुढे आणखी अडचण होते. आजच्या परिस्थितीत प्राथमिक शाळेत मुलांच्या मनात इंग्रजीची प्राथमिक बैठक चांगल्या तऱ्हेनं तयार होणं सर्वथा अशक्य आहे.

आज जगातील विकसित देशातही प्राथमिक पातळीवर दुसरी भाषा शिकवली जात नाही. याचं कारण त्यासाठी लागणाऱ्या सुविधांचा अभाव आणि आदर्श व्यवस्था तयार होण्यातल्या पैशांनी गरीब असलेल्या देशात काय होणार ? परिणामत: प्राथमिक पातळीवरचं हे इंग्रजी शिक्षण म्हणजे आधीच अडखळत जाणाऱ्या सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणाच्या वाटेवर अणकुचीदार काटे पसरणेच ठरेल.

चांगल्या पद्धतीनं शिकवलं तर ४-५ वर्षांत उच्चशिक्षणासाठी, विज्ञान तंत्रशास्त्रासाठी हवं तेवढं इंग्रजी सहज शिकवता येतंच. समाजविज्ञान किंवा साहित्याच्या अभ्यासासाठी थोड्या अधिक प्रावीण्याची आणि त्यासाठी अधिक वेळाची गरज आहे. पाचवी ते बारावी ह्या ८ वर्षांमध्ये आवश्यक तेवढं इंग्रजी शिकवता यायलाच हवं, ते जर आपल्याला साधत नसेल तर १२ वर्षे शिकवूनही जमेल असं कशावरून ?

याशिवायही, काही एक समजूत आल्यावर, इंग्रजी शिकण्याची गरज ज्या त्या माणसाला जाणवल्यावर आवश्यक तेवढं इंग्रजी शिकता येईलच. हो, त्याच्यासाठी शिकण्याजोगं वातावरण आणि संधी मिळण्याची मात्र निश्चितच गरज आहे.

आपल्या देशातल्या अनेक विद्वानांनी १० व्या वर्षांनंतरच इंग्रजी शिकायला सुरुवात केली आणि तरीही त्याचं इंग्रजी कमी दर्जाचं होतं असं कुणालाही म्हणता येणार नाही, असं आजही दिसतं.

७. भाषा शिक्षणामागचा उद्देश आणि पद्धत ही कशी आहे, हीही त्या भाषेच्या शिक्षणाचा दर्जा ठरवणारी बाब आहे. कुठल्याही इयत्तेपासून सुरू केलं तरी ज्याप्रकारे हे शिक्षण पोहोचवलं जातं, ती पद्धत आणि लर्निंग इंग्लिश किंवा त्या प्रकारची पुस्तकं प्रथम दूर सारायला हवीत. त्याशिवाय इंग्रजी शिक्षण साधणं जवळजवळ अशक्य आहे. जुन्या पद्धतीनं म्हणजे साहित्य, व्याकरण, अनुवाद अशा मार्गानं माध्यमिक पातळीवर सुरुवात करूनही, ही दुसरी भाषा शिकणं शक्य आहे. प्राथमिक पातळीवर नाही शिकवलं, तर पुढे जमणारच नाही, हे म्हणणं शिक्षण -व्यवस्थेच्या बेजबाबदार वृत्तीचं निदर्शक आहे.

८. प्राथमिक पातळीवर प्रतिकूल परिस्थितीत, अयोग्य शिक्षकांकडून (ही विशेषणे शिक्षकांबद्दलची असली, तरी मुळांत इंग्रजी शिकवण्याच्या क्षमतेसंदर्भातून ती येतात ) कामचलाऊ दर्जाचं (?) इंग्रजी तरी शिकता येईल याची काय शाश्वती आहे? बरं या सगळ्या उठाठेवीसाठी जो पैसा, वेळ जाणार शिवाय विद्यार्थ्यांना अतिरिक्त ताणातून जावं लागणार, त्यापेक्षा त्यांच्या सोयीसाठी रस्त्यावरच्या पाट्या, तिकिटाचे, गाड्यांचे

नावं-नंबर मातृभाषेत ठेवणं फार सोपं ठरेल.

९. समानतेच्या नावाखाली प्राथमिक पातळीवर इंग्रजी शिकवावी म्हणजे इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून येणाऱ्या मुलांइतकी समान संधी मिळेल, असा जो मुद्दा केला जातो, तो तर भयंकर फसवा आहे, त्यातून असमानतेलाच अधिक चालना मिळते. पहिली पासून इंग्रजी (दुसरी भाषा म्हणून) शिकूनही, इंग्रजी माध्यमाच्या मुलांशी बरोबरी होणारच नाही. इंग्रजी संवादाच्या संधी आणि त्यासाठीचा पाठपुरावा इंग्रजी माध्यम शाळेत जास्त होणार. आर्थिक स्तरांचा वास्तविक विचार पाहता, सर्व सुविधाही त्यांना सहज मिळणार. आणि त्यानंतर इंग्रजी संवादाची आत्मविश्वासपूर्ण हातोटी असणारी ही मुलं इंग्रजी द्वितीय भाषा म्हणून शिकणाऱ्या आमच्या मुलांपेक्षा वरचढ ठरणार.

१०. ज्यांना मातृभाषाच बरी बोलता येत नाही, त्यांना दुसरी भाषाही येणं अवघडच असतं. त्यामुळे त्यांना स्वतःची अशी कुठलीही भाषा मिळणार नाही. विकसित देशांमध्ये प्राथमिक स्तरावर, सामान्यत : एक तृतीयांश वेळ भाषाशिक्षणासाठी दिला जातो. तर आपल्याकडे केवळ एक पंचमांश वेळ त्यासाठी उपलब्ध आहे. प्राथमिक शाळेत वर्षभराकाठी, आपल्याकडे ४०० तास शिक्षणाचं काम चालतं, तर विकसित देशांमध्ये हा काळ ८०० तासांचा आहे. एकच भाषा शिकवण्यासाठी तिथे वर्षाकाठी ३०० तास दिले जातात. आपण सुमारे ८० तासांत दोन भाषा शिकवायला बघणार ? त्यामुळे काहीच धड नाही अशी अवस्था येण्याची शक्यता जास्त.

११. यातून एक फायदा मात्र नक्की होईल, समान संधी मिळाली तरीसुद्धा हे लोक शिकू शकले नाहीत, असं म्हणता येईल.

विषमतेनं व्यापलेल्या या समाजाला शिक्षणाच्या संधीमध्ये समान पातळीवर आणता येणं अशक्य आहे. मुद्दा नुसत्या भाषाशिक्षणाचा नाही, त्यासोबत एक सांस्कृतिक पदरही आहे. खालच्या वर्गाच्या लोकांसाठी या अशा असमान स्पर्धेत उतरताना अवघड करून ठेवलेल्या पद्धतीनं परकी संस्कृती समजावून घेण्याचा पर्याय तरी असतो आणि ते जमलं नाही तर मालक वर्गाच्या शोषणाला गुमान सामोरं तरी जावं लागतं. खरं पाहू गेल्यास ज्या देशांत आज सर्वांपर्यंत किमान दर्जाची साक्षरता पोहोचवण्यातही आपण कमी पडत आहोत, तिथं आणखी एक भाषा शिकण्याची जबरदस्ती करणं म्हणजे, सार्वत्रिक शिक्षणाच्या वाटेत मोठाच अडथळा निर्माण करणं आहे. जगातला एकही देश आजवर अशा दोनदोन भाषा शिकवत सर्वांना शिक्षणाची संधी आणि साक्षरता आणू

शकलेला नाही. अचानकपणे भारतातच हे काय नवीन खूळ आलंय कळत नाही. यामध्ये विशेषत: बुद्धिजीवी लोक काय भूमिका बजावतात ते खरोखरच बघायला हवं.

१२. दुसरी भाषा कोणत्या वर्गापासून शिकवायला लागावं, हा निर्णय त्या समाजातल्या लोकांच्या मतावर ठेवावा, असं म्हटलं जातं. प्राथमिक स्तरावर इंग्रजी शिकवलं जाण्याचा निर्णय सामान्य माणसाला योग्यच वाटतोय, असं म्हटलं गेलं. इथे साहजिकच एक प्रश्न पडतो, की सामान्य माणूस म्हणजे कोण? या प्रकारची इंग्रजी शिकवण्याची मागणी आमच्या खेड्यापाड्यांतल्या भूमिहीन शेतकऱ्यांनी तर काही केलेली नसणार. हे फक्त शहरी मध्यमवर्गीय लोकांचं म्हणणं आहे, आणि प्रसार माध्यमांच्या मदतीनं हा फसवा प्रचार केला गेला आहे.

खरोखरच जर खेडोपाडीची जनता, प्राथमिक पातळीवर इंग्रजी हवं अशी मागणी करत असती, तर सार्वत्रिक शिक्षणाचं उद्दिष्ट हातात येणं मुळीच कठीण नव्हतं. त्यासाठी कोणा कायद्याची, धोरणातल्या बदलांचीही गरज नव्हती. प्राथमिक स्तरावर इंग्रजी हवं ही जर खरोखरच सार्वजनिक मागणी असती, तर सार्वत्रिक शिक्षण साध्य करणं म्हणजे अधिक शाळा उघडणं एवढंच राहिलं असतं. तेवढं केलं की काम भागलं.

शिक्षणासाठी इच्छा, ऊर्मी असणं हीच किती मोठी अडचण आहे. अशात इंग्रजी शिक्षणासाठी मात्र सर्वांची एकमतानं तयारी असणं कसं काय शक्य आहे?

१३. एरीक फ्रॉम नावाच्या विचारवंतानं असं म्हटलंय की भाषण स्वातंत्र्य ही गोष्ट जरा फसवीच आहे, कारण सामान्यपणे आसपास जो विचार केला जातो, तोच विचार लोक करतात, तेच बोलतात. म्हणजे, सामान्यपणे जनमताच्या परिघाबाहेर कुणी जात नाही, स्वत:च्या पद्धतीनं वेगळा विचार केला जात नाही. स्वत:च्या मतांच्या, विचाराच्या मागच्या भूमिका, तार्किक आधार शोधणं, त्यांना तपासणं यासाठी लोकांना मदत करणं हेच सर्वांत कठीण काम असतं.

चांगलं शिक्षण नेहमी हेच काम करतं, ही मदत देतं.

(पालक नीती, जानेवारी २००० मधून साभार)





अनुक्रमणिका

# पहिलीपासून इंग्रजी : चर्चासत्र

**मृणालिनी शहा**

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे आणि मराठी अभ्यास परिषद पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने रविवार दिनांक पाच मार्च २००० रोजी साहित्य परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहामध्ये 'पहिलीपासून इंग्रजी' या विषयावर चर्चासत्र आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी प्रा. ग. प्र. प्रधान होते.

आतापर्यंतच्या मराठी माध्यमांच्या माध्यमिक शाळेतील अभ्यासक्रमांमध्ये पाचवीपासून इंग्रजी भाषा हा एक विषय असे. परंतु महाराष्ट्र सरकारने मराठी माध्यमांच्या प्राथमिक शाळेतील पहिलीपासून इंग्रजी हा विषय नव्याने सुरू केल्याची घोषणा डिसेंबर मध्ये केली. त्यामुळे मुलांच्या अभ्यासक्रमातील नव्याने होणारा हा बदल भाषिक क्षेत्रात आणि वैचारिक क्षेत्रात एक चर्चेचा विषय झाला आहे. म्हणूनच हे चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्राचे स्वरूप शिक्षणक्षेत्राशी संबंधित निवडक ३०/४० अभ्यासकांसाठी मर्यादित असल्याने साक्षेपी चर्चा झाली.

महाराष्ट्र साहित्य परिषेदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी आपल्या बीजनिबंधामध्ये अभ्यासक्रमातील इंग्रजी भाषेच्या परिणामांचा ऐतिहासिक आढावा सादर केला. पहिलीपासून इंग्रजी शिकवल्याने विद्यार्थ्यांवर अकारण अभ्यासाचा बोजा पडेल आणि मूळ विषयांकडे दुर्लक्ष होईल, असे मत व्यक्त करून ही योजना गांभीर्याने राबविली जाईल की नाही अशी शंका उपस्थित करून या योजनेचा समाजातील सर्वांनी विचार करावा असे आवाहन केले. पहिलीपासून इंग्रजी शिक्षण सक्तीचे या विषयावर उपस्थितांनी आपापली भूमिका मांडून सखोल चर्चा करावी अशी अपेक्षा चर्चासत्राचे निमंत्रण देतानाच व्यक्त केली होते. उपस्थित अभ्यासकांनी केलेल्या चर्चेमध्ये सरळसरळ दोन्ही बाजूंची मते मांडली गेली. उलटसुलट चर्चा झाली. त्यातील काही निवडक मतमतांतरे पाहणे रंजक ठरेल.

महाराष्ट्रीय लोक आय. ए. एस. परीक्षांमध्ये किंवा स्पर्धा परीक्षांमध्ये मागे पडतात याचे कारण त्याचे इंग्रजी चांगले नसते अशी सामान्यतः समजूत असते. परंतु वस्तुस्थिती तशी नसून आपल्या मुलांची इच्छा नसते म्हणून ती मागे पडतात. त्यासाठी इंग्रजी पहिलीपासून शिकवण्याची गरज नाही. यशस्विता आणि इंग्रजी यांचा संबंध

लावण्याची आपली सवय, आपली मानसिकता बदलायला हवी, असे मत आपटे प्रशालेचे मुख्याध्यापक पु. गो. वैद्य यांनी व्यक्त केले. सध्या आपल्याकडे पाचवीपासून जे इंग्रजी शिकवले जाते, ते सुद्धा विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचत नाही. याची अनेक कारणे आहेत. उदा. इंग्रजी भाषा-विषयांत तज्ज्ञ असणारे शिक्षक नसतात, विद्यार्थ्यांच्या मानाने शिक्षकांची संख्या कमी असते, इत्यादी कारणांचा उल्लेख त्यांनी केला. सरकारने सध्या इंग्रजीचे चांगले शिक्षक तयार करण्याचे महत्त्वाचे काम आधी हाती घ्यावे आणि नंतर नवीन प्रयोग करावेत असे ज्यांनी रोखठोकपणे सांगितले त्यात न. म. जोशी, चं.द. इंदापूरकर, शरद वाघ इत्यादी शिक्षणशास्त्रातील प्राध्यापक होते. या नव्या प्रयोगासाठी पाच दिवसांमध्ये प्रशिक्षण देऊन शिक्षकांच्या गुणवत्तेत काही फरक पडणार नाही. म्हणून एक दोन वर्षे शिक्षकांच्या प्रशिक्षणावर भर द्यावा; अशी भूमिका मांडून या योजनेला असणारा विरोध प्रदर्शित केला.

फलटण येथे शाळा चालविण्याऱ्या मॅक्सीम बर्नसन यांनी प्राथमिक शिक्षणामध्ये होणाऱ्या गळतीचा म्हणजे विद्यार्थ्यांच्या संख्येतील गळतीचा प्रश्न उपस्थित केला. आधीच गळतीचे प्रमाण वाढत आहे त्यात या इंग्रजीच्या भयाने अधिक वाढ होईल, असा अंदाज व्यक्त केला. यांचा इंग्रजी शिकवण्याला तत्त्वत: विरोध नाही. पण प्रत्यक्ष व्यवहारात काय चित्र दिसते? वस्तुस्थिती कठोर आहे. इंग्रजी शिकवणे वाटते तेवढे सोपे नाही. चवथीच्या मुलांना सोपे मराठी लिहिता येत नाही तर ते इंग्रजी शिकायला लागले तर एकूणच शिक्षणाचा बोऱ्या वाजेल. म्हणून मराठी- मातृभाषा, तिच्यातील अभिव्यक्ती आधी येऊ दे मग परदेशी भाषेचे पाहू असा सूर दिसून आला. सरकारच्या शैक्षणिक धोरणामध्ये सुसंगती दिसून येत नाही, अशीही टीका त्यांनी केली. इंग्रजीची पहिलीपासून घोषणा एकीकडे करत असतानाच शिक्षकांची संख्या कमी करण्याचा आदेशही सरकारने दिला आहे. म्हणजेच आता आहे त्या शिक्षकांवर हे ओझे लादण्याचा सरकारचा कार्यक्रम निश्चितच अन्यायकारक आहे. तीन लाख शिक्षकांचे ट्रेनिंग कसे शक्य आहे? अध्यापन पद्धतीविषयी सरकार गांभीर्याने विचार करणार आहे की नाही? असे प्रश्न उपस्थित करून बर्नसनबाईंनी या योजनेतून पाचवीचे इंग्रजी अवघड होईल व ग्रामीण भागात नापासांचे प्रमाण वाढेल असे मत प्रदर्शित केले.

जर्मन या परदेशी भाषा शिकवण्याचा अनुभव असणाऱ्या नीती बडवे यांनी ज्ञानभाषा म्हणून इंग्रजीचे महत्त्व मान्य केले पण त्यांच्या मते उच्च शिक्षणाच्या वेळी थोड्या कालावधीमध्ये इंग्रजी शिकता येईल; त्यासाठी पहिलीपासून इंग्रजी शिकण्याची

काहीच गरज नाही. लहान मूल एकाच वेळी दोन तीन भाषा शिकू शकते. या भाषाशास्त्रीय सिद्धांतामध्ये या भाषा अनौपचारिक पद्धतीने शिकणे गृहीत धरलेले असते. परंतु औपचारिक पद्धतीने शाळेच्या अभ्यासक्रमांत इंग्रजीचा अभ्यास करणे अवघड वाटेल. ज्ञानाच्या अभिव्यक्तीसाठी एक भाषा चांगली येणे, त्यावर पकड असणे आवश्यक असते. म्हणून आधी आपली मराठी भाषा, तिचे होणारे आकलन हे अधिक महत्त्वाचे मानणे आवश्यक आहे, अशी भूमिका त्यांनी मांडली.

श्री. के. रं. शिरवाडकर यांनी एका वेगळयाच मुद्द्याला स्पर्श केला. भारतामध्ये इंग्रजी भाषा ब्रिटिशांचे वर्चस्व स्थापन करण्यासाठी आली या ऐतिहासिक घटनेची आठवण करून देऊन आता ही भाषा व्यापारी संस्कृतीच्या आक्रमणातून वर्चस्व प्रस्थापित करत असल्याचे सत्य सांगितले. शिक्षणात इंग्रजी म्हणजे सरस्वती व लक्ष्मी एकत्र येणार म्हणजेच लक्ष्मीचा पुरस्कार केल्यासारखाच आहे. यातूनच आपण हारलेली लढाई करत असल्याची विदारक जाणीव त्यांनी करून दिली. इंग्रजी ही माध्यम म्हणून येत नसून एक भाषा म्हणून शिकवण्याने आपल्या संस्कृतीला काही धोका नाही पोहोचणार असा युक्तिवाद केला जातो. याचे उत्तर देताना ते म्हणाले की जे जे सामर्थ्यशाली असते ते ते दुसऱ्याला हरवते. इंग्रजी सामर्थ्यशाली आहे. ती मराठीला कधी हरवेल ते कळणार देखील नाही. म्हणून या व्यापारी संस्कृतीला विरोध करण्यासाठी इंग्रजीचे स्थान बेताबेताने ठेवावे, असा सल्ला त्यांनी दिला. डॉ. कल्याण काळे यांना देखील पहिलीपासून इंग्रजी हे व्यापारी संस्कृतीचेच फळ वाटते. आणि मुख्य म्हणजे वरवर पाहता ही योजना आदर्श वाटते, पण कोणतीही योजना अमलात आणताना मूळ ध्येयापासून लांब गेलेली असते. तसे याही योजनेचे होईल की काय अशी शंका त्यांना वाटते.

के. पी. चौधरी ह्यांना शिक्षणक्षेत्राचाच अनुभव आहे. पहिलीपासून इंग्रजी शिकवणे वास्तवात अशक्य वाटते. खेड्यात जिथे शिक्षकांची संख्याच मुळात कमी आहे. तिथले शिक्षक काय करणार? शिक्षणात ग्रामीण भाग महत्त्वाचा मानावा. तिथले पालक हा नवा विषय आल्याने इंग्रजीकडेच अधिक लक्ष देण्याची शक्यता आहे. तेव्हा एकूण जनतेचे व शिक्षकांचे काय म्हणणे आहे, तेही सरकारने समजून घ्यावे असे आवाहन चौधरी यांनी केले.

अशा प्रकारे 'पहिलीपासून इंग्रजी' या सरकारी धोरणावर टीका केली गेली. विरोधकांच्या या हल्ल्यामध्ये संस्कृती रक्षणाचाही एक मुद्दा सतत चर्चिला जात होता.





अनुक्रमणिका

इंग्रजी भाषा अशी लहान वयात शिकवली गेल्याने तिचा मराठीवर फार मोठा प्रभाव पडेल. मराठी भाषेवर होणाऱ्या आक्रमणांमुळे मराठी आता एकविसाव्या शतकात जिवंत राहील का?- भाषेबरोबरच संस्कृतीचाही ऱ्हास होईल अशी मांडणी केली गेली होती. या सर्व मुद्द्यांचा विचार, इंग्रजीचे शिक्षण आवश्यक आहे अशी भूमिका घेणाऱ्या वक्त्यांनी केला. त्यांचेही काही मुद्दे विचारार्ह होते.

सरकारी पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळाच्या मराठी विभागातील माधव राजगुरू यांच्या मते एका वेळी दोन भाषा मूल शिकू शकते. त्यामुळे इंग्रजी ही भाषा तो मराठीच्या बरोबरीने सहज शिकू शकेल. सामाजिक दृष्ट्या हा प्रश्न त्यांना महत्त्वाचा वाटतो. सध्या शहरातील आणि उच्चवर्गीयांची मुले इंग्रजी माध्यमामुळे उच्चपदस्थ नोकऱ्या मिळवतात. व्यावसायिक शिक्षणक्रम (उदा. इजिनियर्स , डॉक्टर) याद्वारे समाजात प्रतिष्ठितांमध्ये प्रस्थापित होतात. त्यामानाने बहुजन समाजातील किंवा ग्रामीण भागातील मुले इंग्रजीच्या अभावामुळे मागे पडतात. पहिलीपासून इंग्रजी शिकल्याने ते समाजात बरोबरीचे स्थान मिळवण्यात यशस्वी होतील आणि मुख्य म्हणजे इंग्रजीला विरोध करून मराठी सुधारणार नाही. भाषा प्रवाही असते. ती नक्कीच जिवंत राहील असा आशावाद त्यांनी व्यक्त केला.

पाठ्यपुस्तक निर्मितीमध्ये नवीन अभ्यासक्रम राबवणाऱ्या धनवंती हर्डीकर यांनी प्रथमच एक खुलासा केला की, जरी त्या सरकारच्या पाठ्यपुस्तक निर्मितीमध्ये सहभागी असल्या तरी चर्चासत्रात व्यक्त केलेली मते ही त्यांची स्वतःची आहेत. आतापर्यंत एक आक्षेप घेतला जात आहे की. सरकारने हा निर्णय अचानक लादलेला आहे. परंतु वस्तुस्थिती तशी नाही सरकारने संबंधित लोकांशी चर्चा केलेली आहे, असेही त्यांनी प्रारंभीच सांगितले. शिवाय पूर्वीच्या इतिहासाची उजळणी करण्यापेक्षा हा २००० सालचा निर्णय आहे हे लक्षात घेणे आवश्यक आहे. भाषाशास्त्रीय दृष्ट्या परदेशी भाषा लहानपणापासून शिकणे योग्य की अयोग्य याबद्दल ठोस मत कुणीच मांडत नाही आहे, तसे काही संशोधन झालेले असल्यास ते पुराव्यानिशी दाखवावे असे आवाहन त्यांनी केले. इंग्रजी भाषा आपल्या समाजात आलेलीच आहे; ती कोणीच थोपवू शकणार नाही. म्हणून हा उपक्रम आखला आहे. त्यात अडचणी आहेत म्हणून काय झाले? सुधारणा करायच्या नाहीत का? उगाच भीतिदायक चित्र उभे करू नये अशी विनंती त्यांनी केली. पहिलीपासून इंग्रजी ही सामाजिक गरज बनली आहे. खेड्यापाड्यांतील समूहाची ती गरज आहे. या महानगरपालिकांच्या शाळांमधील

शिक्षकांचा पालकांचा याला मोठा पाठिंबा आहे. सामाजिक प्रेरणा शासनाच्या बाजूने आहे. त्यामुळे विरोध करणाऱ्या या मूठभर लोकांच्या मानसिकतेत बदल घडवून आणला पाहिजे. ती मुलांची गरज असेल तर इंग्रजीची स्थिती सुधारण्यास वाव आहे, असे त्यांना वाटते.

वाणिज्यशाखेमध्ये काम करण्याचा, अभ्यासक्रम तयार करण्याचा चाळीस वर्षांचा अनुभव असलेल्या शेजवलकर यांनी इंग्रजी शिकवण्याची अडचण वाटत नसल्याचे स्पष्टपणे सांगितले. त्यांच्या मते हा उपक्रम शैक्षणिक दृष्ट्या योग्य आहे तरी विरोधकांनी ब्राह्मण्यवाद आणू नये. असे विधान त्यांनी केले, जर्मनी, चीन, जपान या देशांमध्ये पण आता इंग्रजी शिकण्यास सुरुवात झाली आहे. ती विश्वभाषा आहे म्हणून आपणही मान्यता द्यायला हवी. लहानपणी मुले एकावेळी दोन भाषा शिकू शकतील. श्रवणाने भाषा येते- त्याचा बाऊ करू नये. मात्र त्यासाठी व्यवस्थापनाच्या दृष्टीने सरकारने ठोस उपाय योजावेत. असे सांगून संगणकासाठी इंग्रजी कशी आवश्यक आहे हे पटवून दिले.

डॉ. रमेश धोंगडे या भाषाशास्त्रज्ञांनी शास्त्रीय दुष्ट्या विवेचन केले. लहानपणी एक भाषा शिकणे आणि दोन भाषा शिकणे सारखे आहे. तेव्हा भाषा शिकण्याचे केंद्र मेंदूच्या डाव्या बाजूला असते. मात्र मोठेपणी किंवा उशिरा शिकताना उजवीकडचे केंद्र वापरले जाते व त्याचा मेंदूवर ताण येतो. त्यापेक्षा ही एकावेळी दोन भाषा शिकणारी पद्धत अधिक श्रेयस्कर आहे. स्मरणशक्तीचे वेगवेगळे कप्पे मेंदूत नसतात त्यामुळे मुलांच्या मनात किंवा कल्पनाशक्तीत गोंधळ निर्माण होण्याची जी एक भीती सध्या व्यक्त केली जात आहे ती अनाठायी आहे असे मत त्यांनी मांडले. अश्विनी धोंगडे या एस. एन.डी.टी च्या प्राचार्यांनी पण अनुकूल मत दिले. आताची ही मुले वीस वर्षांनी जेव्हा समाजात वावरण्यासाठी- धंदा-नोकरी करण्यासाठी बाहेर पडतील तेव्हा त्यांना इंग्रजीची गरज पडणारच आहे कारण तेव्हा तर संगणकाचा वापर आतापेक्षा दहापटीने वाढेल. तेव्हा इंग्रजी शिकवणे हा द्रष्टेपणाचा निर्णय आहे. मराठीही चांगले शिकवून त्यांना समृद्ध केले पाहिजे-तीही काळाची गरज असल्याचे त्यांनी नमूद केले. डॉ. शंतनू चिंधडे यांनीही इंग्रजीचा झाला तर फायदाच होईल, तोटा होणार नाही असा निर्वाळा दिला. मात्र आपली मराठी भाषा चांगली यायला हवी असेही सांगितले.

डॉ. मा. ग. धडफळे यांनीही इंग्रजी शिकवावे असे मत व्यक्त केले. ३१





अनुक्रमणिका

डिसेंबर, बर्थडे, व्हॅलेंटाइन डे हे सर्व रीतिरिवाज जर आपण साजरे करत आहोत तर या आधुनिक युगात त्यांची भाषा शिकणे गरजेचे आहे. आपल्यावर १५० वर्षे राज्य इंग्रजांनी केले आहे त्यामुळे ती भाषा ही परभाषा राहिलीच नाही. इंग्रजीकडे गुलामगिरी म्हणून पाहू नये, अशी विनंती त्यांनी केली. ती देणगी मानावी. एकोणिसाव्या शतकातील दाखले आताच्या या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक परिस्थितीत लागू पडत नाहीत. मराठीचा अभिमान असायलाच हवा. मातृभाषेचा अभिमान नसेल तरच नवल! पण म्हणून जागतिक भाषेला विरोध कशासाठी? असा प्रश्न त्यांना पडतो. निर्मळ दृष्टिकोणाने या भाषेकडे पाहिले तर मराठीचे भले होईल, असे त्यांना वाटते.

आशा मुंडले यांनीही या उपक्रमाचे स्वागत केले. इंग्रजी शिकवल्याने संस्कृती बदलेल असे म्हणणाऱ्या लोकांना त्यांनी प्रश्न केला की संस्कृती म्हणजे काय? ती कालमानाप्रमाणे बदललीच पाहिजे. तिचा विकास जर अपेक्षित असेल तर सध्याची गरज ओळखून इंग्रजीचा आकस कमी केला पाहिजे. त्यातून आपोआप मराठीही समृद्ध होईल, अशी आशा त्यांनी व्यक्त केली. म. ना. गोगटे यांनी लोकसंख्येच्या प्रश्नाच्या दृष्टीने सांगितले की आताची १०० कोटी लोकसंख्या १५० कोटींच्या घरात जाईल तेव्हा पुढच्या पिढीला फार मोठ्या संघर्षाला तोंड द्यावे लागेल. म्हणून दोनच काय पण तीन भाषा शिकून मराठी लोकांनी संपन्नता, समृद्धता पण प्राप्त करून घ्यायला हवी. फक्त भाषा समृद्ध करायची जबाबदारी या नव्या पिढीपुढे नाही तर मराठी भाषिकांनाही समृद्ध करायचे आहे.

पुणे विद्यापीठातील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी थोड्या वेगळ्या प्रकारे आपले विचार मांडले. त्यांच्या मते अनेक भाषा यायला हरकत नाही. इंग्रजीही यायला पाहिजे. महात्मा फुले यांनी समृद्ध हिंदी-मराठी-इंग्रजी अशी त्रिसूत्री मांडली होती. आपल्या संस्कृतीमध्ये बारीक बारीक स्तर आहेत. त्यामुळे संस्कृतीचा प्रश्न फार गांभीर्यानं घेतला पाहिजे. शिक्षण म्हणजे फक्त करीयर नाही तर व्यक्तिमत्त्वाचा विकास आहे, हे आपण या शिक्षण पद्धतीत विसरून गेलो आहोत. आपल्या समाजाचा - आपल्या परिसराचा परिचय आपल्याला या शिक्षणातून होतो आहे का? ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. आजपर्यंत इंग्रजी शिकलेल्यांनी काही वेगळे नवे निर्माण केले आहे का? इंग्रजी भाषा शिकल्याने नवा शोध लावला आहे का? आपल्या या देशाचे विज्ञान सृष्टीत कोणते योगदान आहे? त्यामुळे इंग्रजी बौद्धिक

विकासासाठी हवी आहे असे वाटत नाही. इंग्रजी हवी आहे ती स्पर्धेसाठी, नोकरी मिळवण्यासाठी असे त्यांनी परखडपणे मांडले 'पहिलीपासून इंग्रजी' किंवा 'इंग्रजी हटाव' अशा घोषणा देण्यापेक्षा शिक्षणाचा गांभीर्याने विचार करण्याची वेळ आली आहे. तो आपण करायला हवा, आधी ती आपली जबाबदारी आहे, असे सांगून या प्रश्नाची व्यामिश्रता लक्षात घेण्याची आवश्यकता दाखवून दिली.

अशाप्रकारे अनेक मतमतांतरे मांडली गेल्याने हे चर्चासत्र उपयुक्त ठरेल, असा विश्वास अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांनी व्यक्त केला. सामाजिक समतेवर व त्यासाठी आवश्यक ते करण्यावरच आपली श्रद्धा असल्याचे त्यांनी आपल्या अध्यक्षीय समारोपात सांगितले 'पहिली पासून इंग्रजी हवी की नको' या प्रश्नाच्या निमित्ताने एकूणच आपल्याला यासंबंधी काय वाटते याचे त्यांनी विवेचन केले. शिक्षणाची संधी सर्वांना मिळाली पाहिजे. त्यांच्या मते त्यात समानता असलीच पाहिजे आणि अशी आग्रही भूमिका प्रत्येकाने घ्यायला हवी, यात शंका नाही. मात्र प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाचे माध्यम मात्र मातृभाषाच असले पाहिजे. त्यामध्ये कसलीही तडजोड त्यांना मान्य नाही. मात्र त्याचवेळी शिक्षणाचा सर्वांगीण विचार करावण्याची गरजही त्यांनी प्रतिपादन केली. विद्यार्थ्यांना, पाल्यांना चांगले शिक्षण मिळण्यासाठी चांगल्या शिक्षकांची गरज आहे, हे तळमळीने सांगितले. शिक्षक चांगला नसेल तर तो विषय - ती भाषा विद्यार्थ्याला कधीच आवडत नाही. यासाठी त्यांनी स्वानुभवच सांगितला की, संस्कृत शिक्षकांचा आणि त्यांचा मेळ न बसल्याने ते संस्कृतपासून लांब गेले आणि इंग्रजीच्या जवळ गेले तेही त्या वेळच्या शिक्षकांमुळेच. म्हणून चांगले शिक्षक तयार करण्याची जबाबदारी सरकारने घ्यावी; तसे प्रयत्न करावेत अशी विनंतीही त्यांनी केली. त्यांच्यातील शिक्षक म्हणून असणारी आस्थाच यावेळी प्रगट झाली.

मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यवाह मृणालिनी शहा यांनी आभार मानले आणि चर्चासत्राची सांगता झाली.

**१ शीतल सहनिवास**
**४६/४ एरंडवन**
**पुणे - ४११००४**
**दूरध्वनी : ५४३३८६९**

■■■





अनुक्रमणिका

# 'ध्वनिताचें केणें'

**प्रा. माधव ना. आचार्य**

डॉ. रा. चिं. ढेरे यांनी नामदेवगाथ्याच्या संहिताशुद्धीविषयी लिहिताना अपपाठांची काही उदाहरणे दिली आहेत. त्यांतील एक असे-नामदेवाच्या बाळक्रीडाविषयक अभंगांमध्ये नंदाघरच्या चंपाषष्ठीविषयी एक अभंग आहे. त्यामध्ये 'करी क्षणामाजी वांकडेचि मुख । हरि खात विख कालवलें ॥' अशी ओळ येते. यातील उत्तरार्धाचा अर्थ 'हरीने विष खाल्ले' असा लावला गेला आहे. (नामदेवरायांची सार्थ गाथा, भाग पहिला, पृ-९० - प्र.सी. सुबंध) ही ओळ आजवरच्या सर्वच गाथ्यांमध्ये अशीच मुद्रित केली गेली असल्यामुळे अपपाठांबरोबर अनर्थाचीही परंपरा सुरू राहिली आहे. वस्तुतः 'हरिखात' असा एक शब्द हवा. हरिख म्हणजे हर्ष. हर्षात विष कालवले, म्हणजे आनंदावर विरजण पडले - असा सरळ अर्थ लागतो. (ढेरे- गंगाजळी- १९७२ पृ- ६७)

संतसाहित्य वाचीत असताना अनेकदा भेटणारा मुद्रणदोषांचा हा अडथळा दुर्लक्षणीय नाही. त्यातच हे दोष नंतरच्या संग्रहांतही प्रायः तसेच अनुसरले गेल्यामुळे धोका वाढतो. एक उदाहरण नोंदतो. डॉ. हे. वि. इनामदार यांचे 'अभंग नवनीत' वाचीत होतो. भावार्थ व भाष्य यांसह संगृहीत केलेल्या अभंगांमध्ये नाथांचे 'अनादि निर्गुण प्रगटली भवानी' या ओळीने आरंभ होणारे एक भारूड आहे. त्यातील एक ओळ अशी -

नवविध भक्तीच्या करीन नवरात्रा
करूनी **पोरी** मागेन ज्ञानपत्रा
(पृ. ३०५)

यातील उतरार्धाचा इनामदारांनी लावलेला अर्थ असा आहे- 'देवीने मला आत्मज्ञान द्यावे, असे पत्र म्हणजे लेखी आश्वासन मी तिच्याजवळ मागेन' (पृ. ३०६) केवळ 'ज्ञानपत्र' या शब्दावर लक्ष केंद्रित करून हा अर्थ केलेला दिसतो. परंतु '<u>पोरीं</u>' हे काय प्रकरण आहे? शंका आल्यामुळे इनामदारांनी ज्या सकल संतगाथ्यातून हे भारूड उद्धृत केले आहे, तो गाथा काढून पाहिला, तर तेथेही ही ओळ अशीच मुद्रित केलेली मिळाली. (सकलसंतगाथा- खंड २, १९६७, पृ. ४७३) समाधान न झाल्यामुळे हा अभंग अन्वय शोधला तेव्हा ही ओळ पुढीलप्रमाणे मिळाली-

करुनी पोटीं मागेन ज्ञानपुत्रा

(साखरे संपादित एकनाथ गाथा- १९९६ पृ. ८०७; प्राचीन गीत मंजूषा- ना. ग. जोशी - १९८९- पृ. ९०) आता अर्थ नीट लागला. एक भीती मात्र त्रास देत राहिली, 'उद्या कुणी 'अभंग-नवनीता' वरून हे भारूड उतरून घेऊन मुद्रित केले की अपपाठांची व तदनुसारी अनर्थांची परंपरा चालू तर राहणार नाही?'

संतसाहित्याच्या वाचनातील व तदनुसारी आकलनातील विघ्ने या उपरोक्त परंपरेपुरती मर्यादित नाहीत. पुष्कळवेळा अज्ञानामुळे वा अन्य काही कारणांमुळे संतसाहित्याच्या भाष्यकारांचे मूळ शब्दांच्या नेमक्या अर्थाकडे दुर्लक्ष होते व चुकीचे वा अपुरे अर्थ प्रसृत होतात. एक उदाहरण नोंदतो. एकनाथांचे 'शिमगा' नामक एक भारूड आहे. त्यातील शेवटच्या ओळी अशा-

एका जनार्जनीं पोस्त । गाणें गातां **हालमस्त** ।
नाहीं तर भडवे समस्त । तुम्ही हसूं नका हसूं नका ।
(सकल संतगाथा- एकनाथ - क्र. ३८११)

नाथांची भारुडे विवरणासह संपादित करणाऱ्या श्री. ना. वि. बडवे ह्यांनी यातील पूर्वार्धाचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे - 'गाणे गाताना तुमचे बरेच हाल होतील, कारण हे विकार तुमच्या गाण्यात अडथळे आणणार. ' (श्री एकनाथ महाराजांची भारुडे - विवरणासह - भाग१-पृ.९२)

वास्तविक येथे 'हालमस्त' हा अरबी-फारसी जोड शब्द आहे. 'हाल' हा अरबी शब्द अव्यय म्हणून येतो तेव्हा त्याचा एक अर्थ 'तल्लीनता' असा आहे. (श्रीपाद जोशी संपादित -उर्दू-मराठी कोश पृ. ४७५) तर 'मस्त' या फारसी विशेषणाचा अर्थ, 'धुंद, झिंगलेला' असा आहे. (उक्त- पृ. ३३७). हे अर्थ लक्षात घेतले की उपरोक्त ओळींचा अर्थ असा लागतो, '(सत्त्वगुणाचे / भक्तीचे) गाणे तुम्ही धुंदतल्लीन होऊन गावे. एरव्ही तुम्ही केवळ भडवे (साजिंदे, कुट्ण्ये) राहाल. मी सांगतो, ही गोष्ट हसण्यावर नेऊ नका, एवढेच पोस्त (बक्षिसी) एकनाथ मागत आहेत.'

येथे परभाषेचे अज्ञान हे कारण असावे. पुष्कळवेळा आणखीही एक कारण संभवते. भारुडे ही रूपके. यांतील अध्यात्मबोध हा उपमेयस्थानी. त्यामुळे बहुतेक भाष्यकार तो बोध उलगडण्यावरच भर देतात. परिणामतः उपमानविश्वाकडे दुर्लक्ष होते. वास्तविक पाहता भारुडांतील हे उपमानविश्व विलक्षण संपन्न आहे. अनेक भटक्या जमाती, भिक्षेकरी, त्यांचा जीवनक्रम, त्यांची दैवते, त्यांचे उपासनाविधी आणि तदनुसारी विशिष्ट भाषा या सर्वांचा जर नीट उलगडा झाला नाही तर वाचकाच्या

आकलनात उणेपणा येतो. त्यामुळे एक असमाधान ठसठसत राहते. पण 'लक्षात' कोण घेतो?

नाथांचे 'नवलाई' नामक एक भारूड आहे. (सकल एकनाथ-क्र ३८२४) याचा आरंभ असा आहे -

आतां झालें नवलाई । पुनः जन्मा येणे नाहीं ।'

एका अभ्यासकांनी याचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे- 'आता मला पुन्हा जन्म घ्यावा लागणार नाही, हे मोठे नवल घडले आहे.' वास्तविक 'नवलाई' ही एक ग्रामदेवता आहे. प्रस्तुत भारूड हा त्या देवीच्या भगतिणीचा उद्‌गार आहे. (या 'नवलाई' संबंधी नाथांचे आणखीही एक भारूड आहे - क्र. ३९७७; परंतु तेथे चुकीने 'वैदीण' असे शीर्षक दिले गेले आहे. - ढेरे-महामाया - पृ. २४६) नवलाई व पावणाई ही कोकणातील ग्रामदेवतांची एक जोडी आहे. नवलाईला काहीजण नवदुर्गा समजतात. पावणाई ही खलाशीण. काहींच्या मते जखीण, डंखीण इत्यादी पिशाच्च देवतांपैकीच या देवता आहेत. मात्र कोकणातील काही चित्पावन ब्राह्मण या देवतांना भजणारे आहेत. (भारतीय संस्कृतिकोश - खंड तीन - ४०४, खंड चार-७१०) 'नवलाई' चा हा अर्थ जर कळला नाही, तर त्यानंतर येणाऱ्या बोधाचे कुंकू, भक्तीची काठी, ज्ञानाचा कुर्कुला व प्रेमाचा खुळखुळा या रूपकांचा उलगडा कसा करणार?

संत हे बहुजनांचे कवी. स्वाभाविकच ग्रामजीवनातील अनेक शब्द ते सहज योजून जातात. आज हळू हळू असे व्यवहार व तद्‌वाचक शब्द लुप्त होत चालले आहेत. परिणामतः एखाद्या ओवीचा वा अभंगाचा गोळाबेरीज अर्थ लागला तरी कवीच्या अभिप्रायापासून आपण दूरच राहतो. आकलनाच्या या अपुऱ्या क्षितिजामुळे आस्वादात विघ्नच येते. ज्ञानदेवांच्या एका ओवीचे उदाहरण घेऊ. सहाव्या अध्यायात, 'योगभ्रष्टाच्या पुनर्जन्माविषयी' सांगताना ज्ञानदेव लिहितात.

पाठि जन्मे संसारीं । परि सकल धर्माचां माहेरीं ।
लांबा उगवे आगरीं । विभवश्रियेचां ॥ (ज्ञानदेवी - ६. ४४२)

यातील 'लांबा' हा शब्द महत्त्वाचा आहे. याचा 'भाताचे रोप, कोंब, पीक' असा अर्थ केला गेला आहे. तो पूर्णतः चुकीचा नसला तरी ज्ञानदेवांना अभिप्रेत असणाऱ्या आशयाच्या जवळ जाण्यासाठी अपुरा आहे. लांबा हा कोकणी आगरातील एक खास शब्द आहे. भाताचे पीक तयार होऊन कापणी होण्यापूर्वीच काही वेळा कणशीतील भातगोटे खाली गळून पडतात. हा लांबा. काही गरीब कष्टकरी कापणीनंतर

हा लांबा गोळा करून त्याचे पोहे करतात. एखादेवेळी अचानक पाऊस येतो व त्यावेळी हा लांबा रुजतोही. हे लक्षात घेऊनच मोल्सवर्थने पुढील अर्थ दिला आहे -'Rice springing up from seed accidentally dropped.'

खार जमिनीत आदल्या वर्षी गळलेल्या भात गोट्यापासून आगाऊच उगवणाऱ्या रोपांनाही लांबा म्हणतात. पेरणीच्या भातापेक्षा या लांब्याचे भात लवकर तयार होते. म्हणून मुख्य पिकाआधीच त्याच्या कणश्या खुडून काढल्या जातात.

लांबा या शब्दाला अशा वेगवेगळ्या अर्थच्छटा आहेत. मोल्सवर्थने दिलेला अर्थ लक्षात घेऊन राजवाड्यांनी आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रथम खंडाच्या अखेरीस जोडलेल्या शब्दकोशात 'लांबा'चा 'पर्जन्य पडून भातगोट्याचे दुसऱ्यांदा उगवणारे रोप' असा अर्थ दिला आहे. दांडेकरही या ओवीचा अर्थ देताना 'भातगोट्याचे रोप' असेच म्हणतात. मंगरूळकर-केळकर यांनी मात्र केवळ 'कोंब' एवढाच अर्थ दिला आहे. अलीकडेच प्रकाशित झालेल्या 'A dictionary of old Marathi (S.G. Tulpule and Anne Feldhous) या कोशातही 'भाताचे रोप' 'a young rice plant' एवढाच अर्थ दिला आहे.

ज्ञानदेव येथे योगभ्रष्टाच्या दुसऱ्या जन्माविषयी बोलत आहेत. योगमार्गावर वाटचाल करीत असताना ज्याचा 'आयुष्यभानू' मध्येच अस्ताला जातो, त्याला कोणती गती प्राप्त होते, असा अर्जुनाचा प्रश्न आहे. त्याला उत्तर देताना श्रीकृष्णाच्या तोंडी ही लांब्याची प्रतिमा येते. परिपक्व होऊन कणशीबरोबर उडव्यात व नंतर मळणी झाल्यावर कणगीत जाणारा भातदाणा वेगळा व मध्येच गळलेला हा लांबा वेगळा. त्याचप्रमाणे आत्मसिद्धीच्या मार्गावरील प्रवास पूर्ण करून मोक्षपदी आरूढ होणारा योगी वेगळा व या मार्गावर प्रवास करताना प्रपंच सुटलेला पण ध्येय गाठण्यापूर्वी मध्येच मृत झालेला हा योगभ्रष्ट वेगळा. पण श्रीकृष्ण असे आश्वासन देतात की, याचा केलेला प्रवास फुकट जात नाही. त्याचा मृत्यू ही त्याने मध्येच घेतलेली अल्पकालीन विश्रांती असते. तो पुन्हा जन्म घेतो तो सर्वधर्मांच्या माहेरघरी, जणू वैभवलक्ष्मीच्या शेतात रूजलेला लांबा. ज्ञानदेवांचे 'रूपकरण' असे सफलसंपूर्ण असते.

- जाता जाता नोंदून ठेवतो की, 'लांबा' हा शब्द केवळ 'भाताचे पीक' या सामान्य अर्थानेही ज्ञानदेवीत आला आहे. (१८.९३)

- अर्थनिश्चितीसाठी काही वेळा तत्कालीन भाषेचे व्याकरणही उपयोगी पडते का? पाहू या.

सहाव्या अध्यायामध्येच पुन्हा जन्मलेल्या या योग्याचा गौरव करताना ज्ञानदेव म्हणतात,

हा संसारु उमाणितें माप । किं अष्टांग सामग्रियेचें दीप ।
(ज्ञानदेवी - ६.४६१)

मंगरूळकर-केळकरांनी या ओळीचा अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे- 'हा (योगी म्हणजे) संसार मोजावयाचे माप (च), किंवा अष्टांग (योगाच्या) सामग्रीचे द्वीप (होय.)'

द्वीप = बेट असा अर्थ येथे घेतलेला आहे.

- दांडेकरांनी 'अष्टांगसाम्रगीचे द्वीप' असा पाठ घेऊन 'अष्टांग-योगाची सामग्री दाखविणारा जणू दिवाच होय' -असा अर्थ दिला आहे.

-भिडे 'द्वीप' असा पाठ घेऊन 'बेट' असाच अर्थ करतात.

-मंगरूळकर - केळकरांनी दीप < द्वीप (=बेट) हा दिलेला अर्थ कसा बरोबर आहे, हे 'अष्टांग सामग्रियेचें' या नपु. रूपावरून कळते.

या संदर्भात प्रस्तुत ओवीसंबंधीच्या टीपेतील अर्जुनवाडकरांचा खुलासा असा आहे- 'दीप -हा तत्सम शब्द नाही; द्वीप (सं.) ह्यावरून आलेला तद्‌भव शब्द आहे. तुलनार्थ- द्वार > दार 'दीप' (दिवा) पुल्लिंगी, तर 'दीप' (द्वीप) नपुंसकलिंगी म्हणून 'सामग्रियेचें' हे विशेषण नपुंसकलिंगी ...' (ज्ञानदेवी - पृ. ३७०)

वाचकांचे काही पूर्वग्रहही एखादे वेळी आकलनातील विघ्न ठरू शकतात. ज्ञानदेवीच्या आरंभी जे गणेशवर्णन आहे त्यातील एक ओवी अशी-

एका हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु ।
तो बौद्धमतसंकेतु । वार्त्तिकांचा ॥ (१.१२)

या ओवीचा मंगरूळकर -केळकरकृत अर्थ असा-

'(कुमारिलभट्टांच्या तंत्र-) वार्त्तिकांची जी बौद्धमतविषयक (म्हणजे बौद्धमताचा निरास करणारी) खूण आहे, तो (गणेशाच्या) एका हातातील मुळात मोडलेला असा दात होय.'

तर दांडेकरांचा अर्थ असा आहे-

'बौद्धमताचे निदर्शन करणाऱ्या बौद्ध वार्त्तिकांनी प्रतिपादलेले बौद्धमत, हाच कोणी स्वभावतः खंडित असलेला दात, तो (पातंजल दर्शनरूपी) एका हातात धरला आहे.

आता येथे 'वार्त्तिक' कोणते, हा प्रश्न निर्माण होतो. त्याचा निर्णय लावण्यासाठी ज्ञानदेवांच्या तात्त्विक परंपरेकडे पूर्वग्रह बाजूला ठेवून पाहावे लागते.

ज्ञानदेवांनी येथे गणेशाची षड्भुज आकृती गृहीत धरली आहे. सहा दर्शने हे त्या आकृतीचे सहा हात. त्या हातांतील आयुधे कोणती? उपरोक्त ओवीत 'खंडितु दंतु' ह्या आयुधाचा उल्लेख आहे. हे आयुध पकडणारा हात मंगरूळकर-केळकरांच्या मते 'पूर्वमीमांसेचा' ('ज्ञानदेवांची षड्दर्शने'- वि.मो. केळकर -ज्ञानदेवीच्या परिशिष्टात संगृहीत केलेला निबंध - पृ. १७०३) दांडेकरांच्या मते तो 'पातंजल योगदर्शना'चा. हा मतभेद एवढ्यावरच संपत नाही. मंगरूळकर- केळकरांच्या मते हे आयुध म्हणजे कुमारिलभट्टांचा 'तंत्रवार्त्तिक' हा ग्रंथ; तर दांडेकरांच्या मते हे वार्त्तिक बौद्धांचे! आता मौज अशी की कुमारिलभट्टांचा 'तंत्रवार्त्तिक' हा ग्रंथ म्हणजे पूर्वमीमांसा या दर्शनावरीलच वार्त्तिक आहे. (वार्त्तिक म्हणजे मूळ ग्रंथातील उक्त, अनुक्त वा दुरुक्त भाग स्पष्ट, परिपूर्ण वा दुरुस्त करणारे विधान.) म्हणजे गणेशाचा हात पूर्वमीमांसेचा व त्यातील आयुधही त्याच दर्शनाचे. मग ते आयुध कसे होणार? म्हणून मंगरूळकर-केळकर त्या ओवीच्या भाषांतरात पदरचे शब्द घालतात. त्यासाठी 'बौद्धमत संकेतु' या शब्दाचा अर्थ लावण्यासाठी बौद्धमत = बौद्धविषयक = बौद्धमताचा निरास करणारा संकेत (=खूण) एवढा द्राविडी प्राणायाम करावा लागला आहे.

या उलट दांडेकरांनी हे वार्त्तिक बौद्धांचे मानल्यामुळे सरळ अर्थ लागतो. याचे कारण दांडेकरांची ज्ञानदेवांच्या तात्त्विक भूमिकेकडे पाहणारी दृष्टी स्वच्छ व व्यापक आहे. आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेत ते म्हणतात, '.... पुष्कळांची अशी कल्पना आहे की ज्ञानदेव हे योगी, तेव्हा त्यांच्या ठिकाणी शास्त्राभ्यास व तत्त्वचिकित्सा ही नाहीतच .... परंतु ज्ञानेशांना चांगला शास्त्रपरिचय होता... ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीचे गणपतीचे वर्णन विचारात घेण्यासारखे आहे. वेद, स्मृती, पुराणे, आस्तिक षड्दर्शने, नास्तिक दर्शने, द्वैताद्वैतमते ... उपनिषदे या सर्वांचा नुसता उल्लेख नव्हे तर शब्दब्रह्मातील त्यांचे स्थान दाखविणारे निर्देश त्यात आहेत...' (पृ. १२१) दांडेकरांनी येथे नास्तिक (=वेदप्रामाण्य न मानणाऱ्या) दर्शनांचाही केलेला उल्लेख महत्त्वाचा आहे. त्याला अनुसरूनच ते 'वार्त्तिक' म्हणजे 'बौद्धांचे वार्त्तिक' मानतात.

आता एकच प्रश्न उरतो. हे बौद्ध वार्त्तिक कोणते? येथे डॉ. सदानंद मोरे आपल्या मदतीला येतात. 'ज्ञानेश्वरीतील बौद्धमत संकेत' या लेखात ते म्हणतात, ''बौद्धसंकेताच्या स्वभावत:च खंडित असलेल्या दाताने ज्ञानदेवांना खरोखर बौद्धांचा

शून्यवादच अभिप्रेत आहे आणि वार्त्तिक शब्दाने त्यांना धर्मकीर्ति या सर्वश्रेष्ठ बौद्धितत्त्ववेत्त्याचा 'प्रमाणवार्त्तिक' हा ग्रंथ अभिप्रेत आहे.'' (त्रयोदशी -पृ.३७)

ज्ञानदेव हे काश्मीरी शैवपरंपरेतील. शांतरसाचा पुरस्कार करणारे आनंदवर्धन-अभिनवगुप्तही याच परंपरेतील. काश्मीर ही शैव, वैष्णव व बौद्ध या तिघांचीही विकासभूमी. या तिघांमध्ये विचारांची देवाण-घेवाण आहे. शैवांचे व बौद्धांचे संबंध तर विशेष प्रकारचे आहेत. धर्मकीर्तीच्या ज्या प्रमाणवार्तिकावरील टीकेवर आनंदवर्धनाने टीका लिहिली तो मूळ ग्रंथ ज्ञानदेवांना अभिप्रेत असणे हे असंभवनीय नाही. भगवद्‌गीतेची शांतरसप्रधानता प्रथम ज्ञानदेवांनीच दाखवून दिली. आणि हा 'शांत' रस ही तर बौद्धांचीच देणगी.

पूर्वग्रह बाजूला ठेवून विचारपरंपरेकडे डोळसपणे पाहिले की आकलनाचे क्षितिज कसे स्वच्छ होऊ लागते, हे या उदाहरणावरून लक्षात येईल.

शब्दब्रह्माचे वर्णन करताना ज्ञानदेवांनी, 'रूणझुणती क्षुद्रघंटिका अर्थध्वनी' (१.७) असे म्हटले आहे. घुंगुरांच्या निनादणाऱ्या ध्वनीप्रमाणे काव्यातील ध्वन्यर्थही वाच्यार्थाच्या आकलनानंतर रसिकमनात दीर्घकाळ घुमत राहतो. परंतु त्यासाठी वाच्यार्थाकडून ध्वन्यर्थाकडे जाणारा मार्ग निर्विघ्न हवा. एरव्ही कवीने रसिकांसमोर पसरलेले 'ध्वनिताचें केणें' (६.२९२) वायाच जाणार.

म्हणूनच येथवर अशी काही विघ्ने संकलित केली. शेवटी एका विचाराचे केवळ सूतोवाच करून हा नस्ता उद्योग थांबवितो.

विचार संतांच्या कथनासंबंधीचा आहे. संत जसे आत्मकथन करतात, तसेच रामकृष्णादींच्या व अन्य संतांच्या चरित्रांचेही कथन करतात. या कथनात अनेक मिथके एकमेकांत मिसळून गेलेली असतात. त्यातच वास्तविक, प्रातिभासिक व आध्यात्मिक अशा अस्तित्वकक्षांचेही विलयन झालेले असते. उदा. नामदेवाच्या आत्मकथेमध्ये वास्तविक व आध्यात्मिक पातळीवरची नामदेवकथा व प्रातिभासिक पातळीवरची विठ्ठलकथा यांचे जे मजेदार मिश्रण झाले आहे, ते उलगडल्याशिवाय नामदेवांच्या काही अभंगांचा उलगडा समाधानकारकरीत्या करता येत नाही, ही बाब अभ्यासकांच्या अनुभवाचीच आहे.

**मु. व पोस्ट -चौल**

**ता. अलिबाग. जि. रायगड. ४०२ २०३.**

■■■

# शैलीदार नाटककार कालिदास

**वामन केशव लेले**

आज आषाढ शुक्ल प्रतिपदा आहे अर्थात भारतीय कालगणनेनुसार आषाढ महिन्याचा पहिला दिवस. महाकवी कालिदासाच्या 'मेघदूतम्' ह्या खण्डकाव्यातील 'आषाढस्य प्रथमदिवसे----' ह्या उल्लेखाच्या अनुरोधाने आजचा दिवस 'महाकवी कालिदास-दिन' म्हणून साजरा करण्याची प्रथा आहे. तिला अनुसरून आपण आज ह्या प्राचीन भारतीय अद्वितीय कवीला आदरांजली वाहणार आहोत. पण तसे करण्यापूर्वी कालिदास आणि त्याचे वाङ्मयीन कर्तृत्व ह्याविषयी थोडेसे प्रास्तविक करणे योग्य ठरेल.

आपणा सर्वांना ठाऊकच आहे की, प्राचीन भारतीय ललित साहित्यिकामध्ये कालिदासाला अग्रपूजेचा बहुमान देण्यात येतो. जरी प्राचीन भारतात संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पैशाची व देशी ह्या भाषांत निरनिराळे वाङ्मयप्रकार यशस्वीपणे हाताळणारे अक्षरशः हजारो ग्रंथकार होऊन गेले असले तरी कविवर कालिदासाला 'यासम हा' असेच मानतात. त्याच्या एका अनन्य भक्ताने त्याला

पुरा कवीनां गणनाप्रसङ्गे कनिष्ठिकाधिष्ठित कालिदासः।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव ॥

अशी गौरवांजली वाहिली आहे.

अशा ह्या असामान्य कवीचा लेखनप्रपंच मात्र अगदी आटोपशीर आहे. मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय व अभिज्ञानशाकुन्तल ही तीन नाटके, कुमारसंभव व रघुवंश ही दोन महाकाव्ये; मेघदूत हे खण्डकाव्य आणि ऋतुसंहार हे सहा ऋतूंचे वर्णन करणारे लघुकाव्य इतकीच कालिदासाची मोजकी साहित्यसंपदा आहे. पण ती अनेक गुणवैशिष्ट्यांनी विनटलेली आहे. ह्या साहित्यकृतींपैकी 'अभिज्ञानशाकुन्तलम्' ह्या रमणीय नाटकाने कालिदासाला दिगन्त कीर्ती मिळवून देऊन अजरामर केले आहे. त्या नाटकाचे कथानक सर्वांना ठाऊकच आहे. म्हणून ते सांगण्याची गरज नाही.आज आपण ह्या नाटकाच्या भाषेचा एका वेगळ्या दृष्टिकोणातून सौंदर्यास्वाद घेणार आहोत.

शाकुन्तल हे नाटक आहे. ते प्रेक्षकांनी प्रेक्षागृहात बसून पाहावे आणि ऐकावे अशी अपेक्षा असते. म्हणजेच ते रंगमंचावर प्रेक्षकांच्या समोर घडत असते; साकार होत असते. त्याच्या ह्या साकार होण्याला रंगमंचावरची विविध स्त्रीपुरुष पात्रे, त्यांचे पोशाख, त्यांचा अभिनय आणि देखावे ह्या गोष्टींची जितकी मदत होते त्याहून काकणभर अधिक मदत पात्रांच्या मुखांवाटे उच्चारल्या जाणाऱ्या 'वाङ्मया'ची होत असते. नाटकातल्या

वाङ्मयात गद्य व पद्य ही दोन्ही माध्यमे वापरलेली असतात, ही बाब सर्वज्ञात आहे. शिवाय प्राचीन भारतीय नाटकांत संस्कृत, प्राकृत, शौरसेनी, मागधी, शकारी इत्यादी वेगवेगळ्या भाषा व बोलीही वापरलेल्या दिसून येतात. नाटकातली स्त्री-पुरुषपात्रे त्या वेगवेगळ्या भाषंमधल्या गद्याचा व पद्याचा वापर करून आपापली स्वभाववैशिष्ट्ये प्रगट करतात, आपापले विचार व विकार व्यक्त करतात आणि आपापल्या क्रियाप्रतिक्रियांशी प्रेक्षकांचा परिचय करून देतात. पात्रांच्या अशा संभाषणाच्या द्वारेच नाटकातले प्रसंग घडत असतात आणि नाटकाचे कथानक हळूहळू आकार धारण करून अखेर शेवटी पूर्ण होत असते. वेगळ्या शब्दांत सांगायचे तर नाटकातल्या पात्रांची संभाषणेच नाटकाचे संपूर्ण 'विणकाम' करीत असतात.

१

नाटकातली काही संभाषणे आपल्या दैनंदिन व्यावहारिक जीवनातल्या संभाषणांसारखी साधी व सरळसोट असतात. त्यांना 'व्यावहारिक' संभाषणे म्हणणे, योग्य वाटते. तर काही संभाषणे कानामनाला रिझवणारी असतात. त्यांना 'काव्यात्मक संवाद' म्हणावेसे वाटते. क्रिस्टल व डेव्ही ह्या दोघा पाश्चात्त्य विचारवंतांनी **Investigating English Style** ह्या नावाचे पुस्तक संयुक्तपणे लिहिले असून त्यात व्यावहारिक संभाषणांची अनेक वैशिष्ट्ये नमूद केली आहेत. ती अशी: व्यावहारिक संभाषणांत अतिशयोक्ती असते; संभाषणांत भाग घेणाऱ्या व्यक्ती एकमेकींची वाक्ये पूर्ण करीत असतात; कधीकधी ऐकणारी व्यक्ती एखाददुसराच शब्द उच्चारते; तर कधी 'जनात एक तर मनात दुसरेच' असाही प्रकार असतो. व्यावहारिक संभाषणांत प्रश्नात्मक वाक्ये खूप असतात; बोलणाऱ्या व्यक्ती शब्दांची आणि विचारांचीही पुनरुक्ती बिनदिक्कतपणे करीत असतात. शिवाय एकाच वेळी दोन किंवा अधिक व्यक्ती एकदम बोलत असल्याचेही दिसून येते.

कालिदासाने क्रिस्टल व डेव्ही यांचा उपर्युक्त ग्रंथ वाचलेला असण्याची शक्यताच नाही, हे उघड आहे. पण त्याने मानवी जीवनाचा ग्रंथ उत्तम रीतीने अभ्यासलेला होता. त्याला लोकांच्या बोलण्या-वागण्याचे अतिशय सूक्ष्म ज्ञान होते. त्यामुळेच व्यावहारिक संभाषणाची वर नमूद केलेली सर्व वैशिष्ट्ये त्याच्या स्त्रीपुरुषपात्रांच्या बोलण्यात ठसठशीतपणे जाणवतात. अशा संभाषणांचा प्रत्यक्ष परिचयच करून घेऊ.

आपल्या नेहमीच्या बोलण्यात शब्दांच्या निवडीच्या बाबतीत व अर्थाच्या अभिव्यक्तीच्या बाबतीत काटेकोरपणाचा किंवा संयमाचा काहीसा अभाव असतो. 'मी असं दृश्य जन्मात पाहिलं नव्हतं', असे आपण अगदी सहजपणे बोलून जातो. तसेच

‘त्याच्यासारखा हुशार मनुष्य शोधू जाता सापडणार नाही’, असा अभिप्राय आपण सहज व्यक्त करून जातो. कालिदासाने मनुष्याची ही लकब अचूकपणे हेरून तिचे दर्शन शाकुंतलात घडविले आहे. ह्या लकबीचे एक नुमनेदार उदाहरण अवलोका.

काश्यप ऋषींचा शिष्य विरहिणी स्त्रियांच्या दुःखाचे वर्णन करताना एक अतिशय व्यापक विधान करतो. तो म्हणतो :

इष्ट-प्रवास-जनितान्यबलाजनस्य ।
दुःखानि नूनमतिमात्र-सुदुःसहानि ॥ (शाकुंतल पृ. ७८)

अर्थात - ज्या अबलांच्या प्रिय व्यक्ती प्रवासाच्या निमित्ताने परगांवी गेलेल्या असतात त्या अबलांचे विरहदुःख प्रमाणाबाहेर व अत्यंत दुःसह असते.

शिष्याच्या ह्या बोलण्यात अतिशयोक्तीची अतिशयोक्ती आहे, असेच नाही का म्हणता येत?

आता व्यावहारिक संभाषणाचा आणखी एक पैलू विचारात घेऊ. व्यावहारिक संभाषणाच्या ओघात संभाषकांची मानसिक एकरूपता झालेली असते; एकमेकांना समजून घेण्याची त्यांची वृत्ती बनलेली असते. त्यामुळे संभाषण करणाऱ्यांपैकी एकजण म्हणजे श्रोता दुसऱ्याचे म्हणजे वक्त्याचे वाक्य पूर्ण करतो किंवा त्याचे म्हणणे उचलून धरतो किंवा वक्त्याचा गर्भित आशय आपल्याला जाणवलेला असल्याचे सांगतो. शाकुंतलातील अशा एका संभाषणाचा परिचय करून घेऊ.

प्रसंग नाटकाच्या सहाव्या अंकातला आहे. राजा दुष्यन्त म्हणतो : ‘वयस्य, अन्यच्च । शकुन्तलायाः प्रसाधनं अभिप्रेतं अत्र विस्मृतं अस्माभिः ।’ म्हणजे ‘मित्रा, आणखीही काही रेखाटायचे राहून गेले आहे. शकुंतलेचे सौंदर्यप्रसाधन रेखाटण्याचे मनाशी ठरविले होते, पण ते पार विसरलोच.’ हे ऐकून विदूषक राजाला विचारतो. ‘किमिव ’। म्हणजे ‘कोणत्या प्रकारचे प्रसाधन?’ त्या प्रश्नाचे उत्तर सानुमती नावाची अप्सरा देते, ते असे : ‘वनवासस्य सौकुमार्यस्य विनयस्य च यत् सदृशं भविष्यति ।’ (शा. पृ. १५२) म्हणजे ‘वनातील वास्तव्याला, सुकुमारतेला आणि शालीनतेला शोभून दिसेल असे प्रसाधन.’

हा प्रसंग मोठा मनोज्ञ आहे. शकुंतलेच्या प्रसाधनाच्या रेखाटनाचा विसर पडल्याचा उल्लेख दुष्यन्त करतो, तेव्हा त्याबद्दलचा प्रश्न विदूषक विचारतो. पण विदूषकाच्या प्रश्नाला दुष्यन्त उत्तर देत नाही, तर उत्तर देते वेली-आड लपून राहिलेली मेनकेची मैत्रीण सानुमती नावाची अप्सरा. असा चमत्कार वास्तव जीवनातल्या संभाषणांतही अनेकदा अनुभवास येत असतो. ह्या वरून कालिदासाचे लोकव्यवहाराचे निरीक्षण खूप बारकाईचे होते हे तर





अनुक्रमणिका

आपल्याला पटतेच, पण त्याचे नाट्यनिर्मितीचे कौशल्यही वाखाणण्याजोगे होते, असेही म्हणावेसे वाटते.

शाकुंतलातल्या संभाषणांचे आणखी एक वैशिष्ट्य आता पाहू या. व्यावहारिक संभाषणांत असे अनेकदा जाणवते की, बोलणाऱ्या व्यक्ती आपल्या खऱ्या भावना लपवून ठेवतात आणि प्रकटपणे वेगळ्याच भावना व्यक्त करतात. असे करण्यामागे धाक दाखवणे, उपहास करणे, लटका राग प्रगट करणे, दुसऱ्याला वेडावणे इत्यादींपैकी एखादे निमित्त असते. शाकुंतल नाटकात अशा स्वरूपाचे एक अविस्मरणीय उदाहरण आहे. ते उदाहरणभूत संभाषण विनोदी आहे. प्रसंग आहे नाटकातल्या दुसऱ्या अंकातला. दुष्यन्त शकुंतलेच्या अनन्यसामान्य सौंदर्याचे वर्णन पुढील शब्दांत करतो :

अनाघ्रातं पुष्पं किसलयं अलूनं कररूहैर्
अनाविद्धं रत्नं मधु नवं अनास्वादितरसम्।
अखण्डं पुण्यानां फलं इव च तद् रूपं अनघं
न जाने भोक्तारं कं इह समुपस्थास्यति विधि :॥ (शा. पृ. ४१)

अर्थात - शकुंतला म्हणजे न हुंगलेले फूल, किंवा नखांनी न तोडलेली कोवळी पालवी किंवा वेज न पडलेले रत्न, किंवा न चाखलेला ताजाताजा मध, किंवा पुण्यकृत्यांचे अभंग फळ. हिचा उपभोक्ता म्हणून ब्रह्मदेव कोणाची निवड करणार, कोणास ठाऊक !

दुष्यंताचे हे शकुंतला-लावण्य-गान ऐकून विदूषक त्याला सुचवतो. 'तेन हि लघु परित्रायतां एनां भवान्। मा कस्य अपि तपस्विनः इङ्गुदीतैल-चिक्कणशीर्षस्य हस्ते पतिष्यति।' (शा. पृ. ४१) अर्थात - 'मित्रा दुष्यंता, तू हिचे तातडीने रक्षण कर कसे ! नाहीतर इंगुदीचे चिकट तेल ज्याने आपल्या मस्तकावर चोपडले आहे अशा एखाद्या बैराग्याच्या हातात ही पडायची !'

विदूषकाचे हे विनोदी बोलणे लटके आहे. त्याला खरे तर असे म्हणायचे आहे की, 'मित्रा दुष्यंता, तू ह्या असामान्य लावण्यवतीला त्वरित हस्तगत कर.' 'जनात एक पण मनात दुसरेच' अशा भाषणाचा हा उत्तम नमुनाच नाही काय?

आता व्यावहारिक संभाषणाच्या आणखी एका सूक्ष्म बारकाव्याची ओळख करून घेऊ. व्यावहारिक संभाषणात सहभागी होणाऱ्यांपैकी ऐकणारा बोलणाऱ्याच्या वाक्यातील सुरवातीचा किंवा शेवटचा शब्द, संमती दर्शविण्याचे, विनय प्रगट करण्यासाठी, ऐकलेले अगोदरच ठाऊक असल्याचे सुचवण्यासाठी, विनंतीस मान देण्यासाठी किंवा विशिष्ट मनःस्थिती प्रदर्शित करण्यासाठी, पुन्हा उच्चारतो. कालिदासाने मानवी संभाषणाच्या ह्या वैशिष्ट्याची साक्षेपाने दखल घेतली आहे. ह्या संदर्भात शाकुंतलातील एक हृदयंगम

उदाहरण उद्धृत करण्याजोगे आहे.

नाटकाच्या चवथ्या अंकातला प्रसंग आहे. अनसूया व प्रियंवदा आश्रमाच्या जवळच फुले वेचत असतात. शकुंतला झोपडीत असते. तेवढ्यात 'कोणी आहे का? मी आलो आहे.' असा मोठा हाकारा ऐकू येतो. तो ऐकून कोणीतरी मोठे पाहुणे आले असल्याची अनसूयेची खात्री पटते आणि ती तसे प्रियंवदेला म्हणतेदेखील. त्यावर त्या दोघींमध्ये जे अत्यंत हृद्य संभाषण घडते ते असे :

प्रियंवदा म्हणते, 'ननु उटजसंनिहिता शकुंतला।' (शा. पृ. ७४) म्हणजे, 'अग, खरे तर शकुंतला झोपडीपाशीच आहे की !' (कोणी पाहुणे आले असले तर ती त्यांचे स्वागत करीलच. तू कशाला काळजी करतेस?) असा प्रियवंदेचा आशय आहे. पण प्रगल्भ बुद्धीच्या अनसूयेला शकुंतलेच्या हृदयाची स्पंदने चांगली जाणवत असतात. म्हणून ती प्रियंवदेला समजावते, 'अद्य पुनर् हृदयेन असंनिहिता।' (तत्रैव) म्हणजे, 'प्रियंवदे, (शकुंतला तेथेच आहे हे तुझे म्हणणे सत्य आहे, पण ते अर्धसत्य आहे.) कारण शकुंतला आज (शरीराने झोपडीजवळ आहे) पण मनाने झोपडीजवळ नाही.'

अनसूयेच्या बोलण्याचा रोख असा की, शकुंतला आज मनाने दुष्यंताजवळ आहे. त्यामुळे झोपडीपाशी आलेल्या पाहुण्यांकडे तिचे कदाचित लक्ष जाणार नाही; तिच्याकडून त्यांचे यथोचित आगतस्वागत होणार नाही आणि त्यामुळे काहीतरी भलतेसलते होऊन बसेल. आपण प्रत्यक्ष व्यवहारात जिवाभावाच्या माणसांच्या बाबतीत पुष्कळदा 'ह्या हृदयीचं त्या हृदयी', असे जे अनुभवतो आणि म्हणतो तेच अनसूयेच्या ह्या उद्गारांच्या बाबतीत जाणवते आणि मग पर-इंगितज्ञ कोण - कालिदास की त्याने निर्माण केलेली अनसूया - ह्या विचाराने मनाचा गोड गोंधळ उडतो !

असा सुखद प्रत्यय देणारे आणखी कितीतरी संभाषणप्रसंग शाकुंतल नाटकात आढळतात. त्या सगळ्यांचा परिचय करून घेणे स्थलाभावी शक्य नाही. पण वर जी संभाषणे विचारात घेतली त्यांच्या आधाराने देखील असे निश्चितपणे म्हणता येते की, आपली काल्पनिक पात्रे जिवंत लौकिक स्त्रीपुरुषांसारखी भासावीत, त्यांच्या संभाषणांत वास्तविक स्त्री-पुरुषांच्या संभाषणांच्या तरल व हृद्य छटा प्रतीत व्हाव्यात आणि त्यायोगे प्रेक्षकाला आपण भोवतालच्या खऱ्याखुऱ्या स्त्रीपुरुषांची संभाषणेच ऐकत आहोत अशी प्रचीती यावी अशीच शब्दांची व वाक्यांची निवड आणि योजना कालिदासाने केली आहे. त्याच्या ह्या दक्षतेचे, चोखंदळपणाचे आणि सौंदर्यदृष्टीचे कौतुक करावे तितके थोडे !

२

येथवर नाटकातील व्यावहारिक संभाषणांचे स्वरूप समजून घेतले. आता

नाटकातील काव्यात्मक संवादांची गुणवैशिष्ट्ये जाणून घेऊ व त्यांच्या अनुषंगाने शाकुंतलाचा परामर्श घेऊ. व्यावहारिक संभाषणे ही प्राधान्याने मनोगते परस्परांना कळवण्यासाठी होत असतात, तर काव्यात्मक संवाद हे मनोगते कळवता-कळवता ती मनावर कोरत असतात. म्हणूनच नाटकातले असे काव्यात्मक संवाद नाट्यप्रयोग संपल्यावरही प्रेक्षकांच्या कानांत निनादत राहतात आणि मनांत रुंजी घालत राहतात. त्यांचे प्रारंभ आणि अंत हे दोन्ही बिंदू नियोजित आणि निश्चित असतात. अशा संवादांचा आणि एकूणच शैलीसंपन्न ललित साहित्याचा कसून अभ्यास करून उलमन, क्रुइझर, बॉवडेन, बोल्टन, मॉरिसन, डर्बीशायर, डोब्री, नोवॉटनी, टर्नर इत्यादी पाश्चात्त्य शैली-विचारकांनी जे अनेक शैलीउपाय प्रतिपादिले आहेत त्यांमध्ये अनुप्रास, अन्यधर्मारोप, अर्धोक्ती, अलंकार, आवृत्ती, उत्तर गर्भ प्रश्न, क्रमविपर्यय , नकार, मानुषीकरण, वाक्प्रचार, विचलन, समांतरता व समानार्थकता ह्या रचनाबंधांचा प्रामुख्याने समावेश होतो. हे रचनाबंध म्हणजे अर्थाचे सोने बनविण्याची जणू हुकमी साधने. त्यांना पाश्चात्त्यांनी linguistic resources किंवा stylistic devices असे म्हटले आहे. ही भाषिक साधने म्हणजे ललित साहित्यिकाच्या मनोगताची जणू वाहने असतात. किंबहुना ब्रूक्स व वॉरेन ह्या विचारवंतांनी त्यांना conveyors of meaning असेच म्हटले आहे. ह्या सर्व शैली उपायांची उदाहरणे जरी शाकुंतलात आढळत असली तरी स्थलमर्यादेचे भान ठेवून निवडक उपायांचाच परिचय करून घेऊ.

सर्वप्रथम 'अन्यधर्मारोप' समजून घेऊ. आशय मनोरम करण्याची ही एक प्रभावी क्लृप्ती आहे. जेव्हा एका इंद्रियाची अनुभुती दुसऱ्या इंद्रियाला येत असल्याचे वर्णन केलेले असते किंवा अमूर्त भाव मूर्त झाल्याचे वर्णन केलेले असते तेव्हा तशा वर्णनात अन्यधर्मारोप झाला, असे मानतात. ह्याचे शाकुंतलातील एक उदाहरण अवलोकू.

प्रसंग शाकुंतलाच्या तिसऱ्या अंकातला आहे. शकुंतला दुष्यंताला प्रेमपत्र लिहिते आणि त्यात स्वतःच्या कामविव्हल स्थितीचे वर्णन करते. ती ते पत्र अनसूया आणि प्रियंवदा यांना वाचून दाखवते, तेव्हा झाडाआड लपून बसलेला दुष्यंत एकदम प्रगट होऊन शकुंतलेच्या प्रीतीला एका श्लोकाद्वारे प्रतिसाद देतो. त्याला बघितल्यावर अनसूया व प्रियंवदा 'स्वागतं अविलम्बिनः मनोरथस्य' (शा. पृ. ६३) म्हणजे 'अगदी वेळेवर येणाऱ्या मनोरथाचे स्वागत असो', ह्या शब्दांत दुष्यंताचे स्वागत करतात.

मनोरथ हा वस्तुतः अमूर्त आहे. पण अमूर्त मनोरथ म्हणजेच समूर्त दुष्यंत असा अन्य-धर्म-आरोप ह्या दोघींनी केला आहे.

ह्यानंतर 'अर्धोक्ती' हा शैली-उपाय शाकुंतलाच्या पहिल्या अंकातील एका



अनुक्रमणिका

नाट्यपूर्ण प्रसंगाच्या आधारे जाणून घेऊ. प्रसंग असा - शकुंतला वेलीला पाणी घालत असते; तिच्या मैत्रिणी-अनसूया व प्रियंवदा - तिची थट्टामस्करी करीत असतात. एवढ्यात एक भुंगा शकुंतलेच्या मुखकमलाभोवती घुटमळू लागतो. ती गांगरून जाते, भुंगा आपल्याला चावेल अशी तिला भीती वाटू लागते आणि म्हणून ती, 'ह्या भुंग्यापासून मला वाचवा हो कुणीतरी' अशी करुणा भाकू लागते. तेव्हा तिच्या मैत्रिणी तिला सुचवतात, 'गडे शकुंतले, आपले रक्षण करण्यासाठी दुष्यंताला बोलाव कशी! कारण तपोवनाचे रक्षण करणे हे राजाचे कर्तव्य आहे.' त्या दोघींचा हा 'हितोपदेश' ऐकून स्वतः प्रगट होण्याची हीच योग्य वेळ आहे असे राजाला वाटते आणि तो अचानकपणे अनवधानाने बोलून जातो, 'न भेतव्यं न भेतव्यम्।' (इति अर्धोक्ते) (शा. पृ. १७), म्हणजे 'भिऊ नये, भिऊ नये' ही आश्वासक शब्दांची आवृत्ती मुखावाटे बाहेर पडल्यावर तो एकदम भानावर येतो आणि स्वतःचे खरे स्वरूप उघड करण्याची ही वेळ नाही ह्याची जाणीव झाल्याक्षणी तो पुढे काहीही न बोलता एकदम गप्प बसतो. त्याची ही अर्धोक्ती जितकी बोलकी आहे तितकेच त्यानंतरचे त्याचे मौनही बोलके आहे. किंबहुना शेरिडन बेकरच्या भाषेत सांगायचे म्हणजे ह्या अर्धोक्तीच्याद्वारे हा सर्वच प्रसंग intensify झाला आहे.

अर्धोक्ती ही वक्रोक्ती कशी असते हे समजून घेतल्यावर आता आवृत्तीची म्हणजे पुनरुक्तीची ओळख करून घेऊ. वस्तुतः पुनरुक्ती म्हणजे पुन्हा तेच सांगणे, बोलणे किंवा उच्चारणे हा दोष आहे. पण जेव्हा एखादा कवी एखाद्या कल्पनेवर, अर्थावर किंवा भावनेवर जोर देण्यासाठी किंवा तिच्यावर वाचक-प्रेक्षकांचे लक्ष खिळवून ठेवण्यासाठी एखाद्या शब्दाची किंवा वाक्याची जाणूनबुजून पुनरावृत्ती करतो तेव्हा तशा पुनरावृत्तीला शैली उपाय मानतात. शाकुंतलाच्या दुसऱ्या अंकात ह्या उपायाचे एक नमुनेदार उदाहरण आढळते.

हा प्रसंग दुसऱ्या अंकाच्या सुरुवातीलाच आहे. शिकारीच्या नादाने झपाटलेल्या दुष्यंताच्या मागे फिरता-फिरता विदूषक हैराण झालेला असतो. आपली कशी दुर्दशा झाली आहे तिचे वर्णन करताना तो म्हणतो, 'अयं मृगोऽयं वराहोऽयं शार्दूलः इति मध्याह्नेऽपि ग्रीष्मविरलपादमच्छायासु वनराजीषु आहिण्डयते।' (शा. पृ. ३०) म्हणजे 'हे हरीण, हे डुक्कर, हा वाघ असे करीत-करीत भर दुपारीही हिंडावे लागत आहे आणि तेही कोठे तर रखरखीत उन्हाळ्यामुळे ज्यांच्यातील झाडांच्या सावल्या विरळ झाल्या आहेत अशा जंगलांच्या रांगांतून.'

येथील 'अयं'ची आवृत्ती एकीकडे विदूषकाची निर्विण्णता बोलकी करते तर दुसरीकडे वाचकांच्या कानांना आनंद देते.

ह्यानंतर विचारात घ्यावयाचा शैली-उपाय 'उत्तरगर्भ प्रश्न' हा आहे. हा वक्तृत्वकलेकडून लेखनकलेला वारसारूपाने लाभलेला आहे. ह्याला rhetorical किंवा dramatic question असे म्हणतात. अशा प्रश्नामुळे साहित्याला एकदम 'नाट्या'चा स्पर्श लागतो. ज्या प्रश्नाचे उत्तर त्याच्याच गर्भात म्हणजे पोटात असते तो उत्तरगर्भ प्रश्न होय. कधीकधी सकारात्मक प्रश्न नकारात्मक विधानाचे कार्य करतो तर कधीकधी नकारात्मक प्रश्न सकारात्मक विभाग सूचित करतो. शाकुंतलात ह्याची खूप उदाहरणे आढळतात. त्यांपैकी एक वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण समजून घेऊ.

शाकुंतलाच्या पहिल्या अंकात दुष्यंताच्या तोंडी खालील श्लोक आहे :

सरसिजं अनुविद्धं शैवलेनापि रम्यं
मलिनं अपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।
इयं अधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम् ॥ (शा. पृ. १३)

अर्थात - कमळ शेवाळाने वेढलेले असले तरीदेखील सुंदर दिसते; चंद्रावरचा डाग काळा असला तरीदेखील तो चंद्राची शोभा वाढवतो; नाजूक बांध्याची ही वल्कल ल्यालेली असूनही अधिकच आकर्षक दिसत आहे. कारण सुबक अंगलटीच्या व्यक्तींना कोणती वस्तू अलंकार म्हणून शोभून दिसत नाही?

वरील श्लोकाच्या शेवटच्या चरणात नकारात्मक प्रश्न आहे. त्याचे सकारात्मक उत्तर, 'सुंदर व्यक्तींना कोणतीही वस्तू अलंकार म्हणून शोभून दिसते' असे आहे. 'जातीच्या सुंदरीला काहीही शोभते' ही उक्ती प्रसिद्धच आहे. वरील उत्तरगर्भ प्रश्न वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या मनाची पकड घेतो. कालिदासाने ह्या प्रश्नाऐवजी साध्या विधानाची योजना केली असती तर वरील श्लोकाची मनोज्ञताच लोप पावली होती !

ह्यानंतर आता मानुषीकरण ह्या शैली पायाकडे वळू या. ह्याला इंग्रजीत personification असे म्हणतात. निर्जीव वस्तूंवर किंवा मानवेतर वृक्षवनस्पतींवर मानवी रूपाचा, गुणांचा वा स्वभावधर्मांचा अध्यारोप करणे म्हणजे मानुषीकरण करणे. शाकुंतलाच्या अधिकाधिक घटना निसर्गाच्या पार्श्वभूमीवर घडत असल्यामुळे प्रस्तुत शैली उपायाची विपुल उदाहरणे ह्या नाटकात आढळतात. त्यापैकी चवथ्या अंकातल्या एका उदाहरणाचा रसास्वाद घेऊ.

शकुंतला पतिगृही जायला निघते तेव्हाचा हा प्रसंग आहे. ती जाण्यापूर्वी आपल्या मैत्रिणींचा, काश्यपांचा व लतावृक्षांचा निरोप घेत असते. ह्या सर्वांच्या विरहाच्या कल्पनेने तिचे मन गलबलून गेलेले असते; डोळे अश्रूंनी डबडबलेले असतात. इतक्यात हरणाचे

एक गोजिरवाणे पिल्लू तिच्या वल्कलाचे टोक धरते आणि तिला बिलगते. तिचे त्या पिल्लावर अतिशय प्रेम असते. तिने त्याच्या जखमांवर इंगुदीचे तेल लावलेले असते; त्याला आपल्या मुठींनी धान्याचे कण भरवलेले असतात. अशा त्या दोघांची लवकरच ताटातूट होणार असते. त्या हरिणबालकाची समजूत घालण्यासाठी शकुंतला त्याला सांगते : 'वत्स, किं सहवास-परित्यागिनीं मां अनुसरसि। अचिरप्रसूतया जनन्या विना विवर्धित एव। इदानीं अपि मया विरहितं त्वां तातश्चिन्तयिष्यति। निवर्तस्व तावत्।' (शा. पृ. ९३) म्हणजे 'बाळा, मी आता तुझी संगतसोबत सोडून जात आहे. माझ्या मागेमागे का येत आहेस ? तुझ्या जन्मानंतर लवकरच तुझी आई वारली. तेव्हापासून मी तुला आईविना वाढवले. आता मी सासरी निघून गेल्यावर बाबा तुझी काळजी घेतील. म्हणून बेटा, माघारी जा.'

खुद्द शकुंतलेला तिच्या जन्मानंतर तिच्या आईने म्हणजे मेनकेने टाकलेले होते. अशा प्रकारे ती स्वत: आईविना झालेली होती. कश्यपांनी तिचा सांभाळ केला होता. त्या हरिणबालकाची स्थितीही अगदी तिच्यासारखीच होती. म्हणून शकुंतलेला त्याच्याबद्दल खूप आपुलकी वाटत होती आणि म्हणूनच ती त्याला धीर देत होती व आश्रमात परत जाण्यास प्रवृत्त करीत होती. कालिदासाने केलेले हे भावोत्कट वर्णन वाचून येथे निसर्ग मानवाशी समरस झाला आहे की मानव निसर्गाशी एकजीव बनून गेला आहे, त्याचा निर्णय करणे कठीण होऊन बसते.

आता समानान्तरता ह्या शेवटच्या शैली उपायाची ओळख करून घेऊन हे विवेचन आवरते घेऊ. ह्या उपायाला इंग्रजीत **parallelism** असे म्हणतात. लिखाणात समतोल व लय साधण्याचा हा एक हुकमी उपाय आहे. ज्याप्रमाणे दोन रेषांमध्ये सारखे अंतर असते त्यांना समान्तर रेषा म्हणतात. त्याचप्रमाणे दोन शब्दसमूह, वाक्यखंड किंवा वाक्ये ह्यांची एकेका ओळीत पद्धतशीर रचना केली गेली असता समानान्तरता होते. अशा रचनाबंधांची कितीतरी उदाहरणे शाकुंतलात आढळतात. त्यांपैकी एकाचा परिचय करून घेऊ.

हे उदाहरण नाटकाच्या दुसऱ्या अंकातील आहे. दुष्यंत राजा ऋषींच्या यज्ञयागादींचे राक्षसांपासून संरक्षण करण्यासाठी काही दिवस कण्वाश्रमात राहण्याचा निर्णय घेतो. त्याच सुमारास उपवासाचे पारणे फेडण्यासाठी राजाला त्याच्या आईकडून बोलावणे येते. राजाची द्विधा मन:स्थिती होते. ऋषिकार्य करावे की आईच्या बोलावण्यानुसार राजधानीला जावे, हे त्याला कळेनासे होते; तो निर्णय घेऊ शकत नाही. तो म्हणतो : 'इत: तपस्विकार्यम्। इतो गुरूजनाज्ञा। द्वयं अपि अनतिक्रमणीयम्।' (शा. पृ. ४८) म्हणजे 'एकीकडे हे ऋषिजनांचे कार्य, दुसरीकडे वडिलधाऱ्यांची आज्ञा. दोन्हीही डावलता न




अनुक्रमणिका

येण्याजोगी (कार्ये)'. अशा प्रकारे तो दोन कर्तव्यांच्या कात्रीत सापडून किंकर्तव्यमूढ होतो. अशा वेळी त्याने 'किं करणीयम्?' असा प्रश्न विचारला असता तर तो त्या दोन कर्तव्यांपैकी एकाची निवड करण्याची दुष्करता वाचकांच्या मनावर ठसवू शकला नसता. मात्र वरील 'इतः तपस्विकार्यम्। इतो गुरुजनाज्ञा।' ही दोन समानान्तर वाक्ये ते कार्य सहजपणे साधून जातात.

३

सारांश आपण एक दृक्श्राव्य नाटक लिहीत आहोत ह्याचे कालिदासाला भान आहे. नाटकाच्या प्रयोगाच्या विज्ञानाचे त्याला ज्ञान आहे, त्या विज्ञानाच्या खाचाखोचांकडे त्याचे अवधान आहे. म्हणूनच तो नाटकातील व्यावहारिक संभाषणांत आणि काव्यात्मक संवादांतही भाषेचा अतिशय तोलूनमापून व जोखूनपारखून वापर करतो. त्याने नाटकांतील संभाषणांची सहजता राखून त्यांना अतिसामान्य घरगुती संभाषणांची अवकळा येणार नाही अशी दक्षता बाळगली आहे. तद्वत नाटकातील काव्यात्मक संवादांत अति-आलंकारिकतेमुळे उत्पन्न होणारी कृत्रिमता न येऊ देण्याचीही खबरदारी घेतली आहे. त्याने स्वाभाविकता आणि कलात्मकता यांचे मनोहर मिश्रण कौशल्याने साधले आहे. त्यामुळेच शाकुंतल नाटकाची भाषा बहुतांशी प्रयोजन साधक (efficient), प्रभावी (effective) व मनोरम (elegant) उतरली आहे. हे अवघड कार्य यशस्वीपणे साधणाऱ्या त्या शैलीदार सारस्वताला शतशः वंदन!

संदर्भ : लेखान्तर्गत विषयाच्या समग्र विवेचनासाठी जिज्ञासूंनी प्रस्तुत लेखकाचे 'शाकुंतल शैलीशास्त्रीय अभ्यास' (इतिहास-पत्रिका प्रकाशन, ठाणे, प्रथमावृत्ती २६।१२।१९९७) हे पुस्तक पाहावे.

❋ या लेखावर आधारलेले रूपक आकाशवाणी पुणे केंद्रावरून कालिदास दिनी (०२:०७:२००० रोजी) सादर करण्यात आले. अर्थातच लेखापेक्षा रूपक वेगळे होते.

❋ प्रस्तुत लेखातील अवतरणांसाठी शाकुंतल नाटकाचे पुढील संस्करण वापरले आहे.
कालिदासविरचितम् अभिज्ञानशाकुन्तलम् - संपा. अ. बा. गजेन्द्रगडकर
द पॉप्युलर बुक स्टोअर, सुरत, पाचवी आवृत्ती, १९५१. वाचन सुकर व्हावे म्हणूनच कुठे कुठे संधी सोडवून ही अवतरणे दिली आहेत.

■■■

# प्राचीन मराठी शब्दकोश - काही निरीक्षणे

**डॉ. ब्रह्मानंद देशपांडे**

प्राचीन मराठी भाषेच्या शास्त्रशुद्ध शब्दकोशाची नितात आवश्यकता होतीच. ती कै.शं.गो. तुळपुळे आणि ॲन फेल्डहाऊस यांच्या अथक परिश्रमाने सिद्ध झालेल्या A Dictionary of Old Marathi या कोशाने पूर्ण केली आहे. या कोशाविषयी आणि काही शब्दाच्या अर्थाविषयी काही निरीक्षणे पुढे नोंदवीत आहे.

१. **अगड** म्हणजे चहूबाजूंनी तटभिंत बांधून बंदिस्त केलेली जागा. हत्तीच्या साठमारीच्या खेळासाठी अशा अगळ बांधीत. कै. रणजित देसाईंच्या एका कथेचे शीर्षकच 'चै अगद चै' (हत्तीला उद्देशून 'चल अगडात चल') असे आहे. षष्ठ म्हणजे हत्ती. मोकाट गुरे कोंडण्याच्या कोंडवाड्याला हिंदी प्रदेशात 'अडगडा' असेच म्हणतात. तेव्हा अगड म्हणजे खंदक हा अर्थ योग्य नव्हे. २. **अगस्ति गौवण** अथवा अगस्ति गवसणी याचा अर्थ सर्वच कोशकार अगस्तीची गवसणी म्हणजेच कुंभ असा देतात. गुरांचा बळी घेणारी अगस्तीरूपी दरी हा अर्थ ज्ञानेश्वरीतील ओवीशी सुसंगत नाही. (अध्याय ९, ओवी १८२). ३. **अग्निष्टिका** म्हणजे विटांचे बांधलेले अग्निकुंड एवढाच अर्थ नव्हे. गावाबाहेर नदीकाठी मध्ये अग्निकुंड आणि सभोवती ओवऱ्या असलेली वास्तू असे. म्हणूनचे 'कुंकुमठाणी अग्निष्टिके वसति' (लीचपू २७७), गोसावियांचे क्षेऊर जालें होतें : ते अग्निष्टिकेसि केलें (लीचपू २७९) असे उल्लेख येतात. हिवाळ्यात ब्राह्मण येथे शेकत बसत आणि शास्त्रचर्चा करीत. राजे, मांडलिक आणि श्रीमंत लोक अशा अग्निष्टिका बांधून देत आणि तेथील इंधनासाठी दान देत. अग्निस्थितिका असा शब्द कंधार येथील राष्ट्रकूटकालीन शिलालेखात आला आहे. (EI., xxxv, PP. 10Sff.) शिलाहार गंडरादित्याचा ताळले ताम्रपट (शक १०३३, शिराकोले, पृ. २५२). रामचंद्रदेव यादवाचा पुरुषोत्तमपुरी ताम्रपट (शक १२४२, संशोनमुक्तावलि, सर ४ था पृ. १४९) आणि हेमाद्रिपंडिताच्या चतुर्वर्गचिंतामणि या ग्रंथातील दानखंड भागातील प्रकरण १२ वे यात अग्निष्टिका दानाचे उल्लेख आहेत. ४. **अग्रोदक** म्हणजे केवळ स्वच्छ, ताजे पाणी इतकाच अर्थ नव्हे. वैष्णव कुटुंबातील - विशेषत: कर्नाटकातील - प्रमुख पुरुषाने सकाळी स्नान करून पूजेसाठी सोवळ्यात आणून ठेवलेल्या - इतर कुठलेही काम आधी न करता - पाण्याला अग्रोदक म्हणतात.





अनुक्रमणिका

५. **अग्रणी** म्हणजे पुढारी हा अर्थ ठीक. गावात ब्राह्मणांची महाजन सभा असे. या महाजनांच्या सभेचे असंख्य उल्लेख कन्नड शिलाताम्रशासनांमधून येतात. या महाजन सभेच्या प्रमुखास अग्रणी म्हणत. त्यापासून अग्रि हे आडनाव सिद्ध झाले आहे. ६. **अडवताव** म्हणजे आडवर्ताव. आडवी वाट. आड रस्ता. 'राया जिया वाटा जाए। ते चोरासि आडवर्तावो होए।' हे आता नीट जुळते. ७. **अतिसो** म्हणजे पीडा, विरोध हा अर्थ योग्य आहे. जैन मुनींना वा तीर्थंकरांना तपस्या करताना 'अतिशय' झाला असे जैन बांधवांच्या नेहमी बोलण्यात येते. ८. **अधिष्ठान** या शब्दाची एक अर्थच्छटा शासकीय कार्यालय असा आहे. अधिष्ठाता म्हणजे राजकीय अधिकारी. परमार उदयादित्य द्वितीय हा त्याच्या अंबाजोगाई शिलालेखात स्वतःला 'अंबासमाधिष्ठित' असेच म्हणवून घेतो. (प्रामकोले, पृष्ठ ३२) ९. **अनंताचे सूड** म्हणजे अनंत व्रताची संहिता नव्हे. सूड हा संगीतशास्त्रातील पारिभाषिक शब्द आहे. शारंग देवाच्या प्रख्यात संगीत रत्नाकर या ग्रंथात चवथ्या अध्यायात सूड प्रबंध असा प्रबंध गायनाचा भेद सांगितला आहे. सालगसूड ही (छायालग सूड) सांगितला आहे. तसाच हा अनंताचा सूड श्रीचक्रधरांनी श्रवण केला. १०. **अंबा अथवा अंबे देस** म्हणजे देवी अथवा अंबा देवीचा देश कसे म्हणावे? अंबा गाव आणि त्या नावाने ओळखला जाणारा देश हे योग्य. अंबाजोगाई येथील अन्य शिलालेखात आम्रदेश आणि आम्रपुर असे उल्लेख येतात. (प्रामकोले, पृ. १२२) तेव्हा हे देशनाम आणि नगरनाम आंबा या फलविशेषापासून पडलेले दिसते. ११. **अमर्दक** हे आवंढा नागनाथ या स्थळाचे पर्यायी नाव नव्हे. अ (आ) मर्दक हे मूल नाव आहे. ते रांजणा (शोधमुद्रा, खंड १ ला, पृ. ५२-६१) आणि अर्धापूर येथील शिलालेखात (IND., p.36) आले आहे. १२. **असमसाहास** म्हणजे अतुलनीय साहस करणारा. हे बिरुद आहे. यावर इतिहासाचार्य राजवाडे यांचे एक टिपण आहे. (इ. विकारा. स.सा. खंड २, पृ. ४८३) १३. **अंकशाला** वा आंकशाला म्हणजे टांकसाळा. येथे नाण्यावर चिन्हे वा राजचिन्हे (अंक) लावली जात. वोरकळुचि जाला आंकशाळा यात वोरकळ (वोरकल्लु - ओरकल्लु, कन्नड - तेलगु) हा शब्द कसाचा दगड या अर्थी आहे तेव्हा आंकशाला म्हणजे कसाचा दगड असा अर्थ करणे योग्य नव्हे. शाला म्हणजे दगड कसे होईल? १४. **आगमसमो** (आगमसमय) यातील 'समय' या पदावरून

तंत्रविद्येतील निश्चित काळ असा अर्थ केला असावा. पण समय म्हणजे सभा. एकत्र येणे. संप्रदाय. लाकुळासमय जिनसमय असे शब्द कन्नड शिलालेखात येतात. (ISD., p.74) समय म्हणजे सभा वा बैठक हा अर्थ लीळाचरित्र उत्तरार्ध लीळा क्र. ५४८ मध्ये संदर्भाने चपखल बसतो. कोलत्यांनी दिलेला कट-कारस्थान हा अर्थ अगदीच संदर्भहीन आहे. १५. **आगिएल** म्हणजे तापलेले तेल हा अर्थ अगदीच अनमानधपक्याने दिला आहे. आगिए(ये)ल या शब्दावर बरीच चर्चा झाली आहे. हा शब्द बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरित (कल्याणी येथील चालुक्य राजा विक्रमादित्य सहावा याचे चरित्र) या काव्यात 'असूत्रयत्पत्रिषु पारसीकं तैलाग्निमेतस्य कृते मनोभूः' (अध्याय ९, श्लोक २०) या चरणात येतो. येथे पारसिक (इराणी) तेल याला अग्नितैल म्हटले आहे. अर्थात् आगियेल म्हणजे घासलेट. जिज्ञासूंनी बाळकृष्ण दाभाडे (महानुभाव, नोव्हेंबर १९७२) आणि देविसिंह चौहान (भारतीय इतिहास आणि संस्कृती, ऑगस्ट ७४) हे लेख पाहावेत. १६. **आंध** म्हणजे आंध्रदेशीय हा अर्थ गोळाबेरीज आहे. विदर्भात आंध्र ही स्वतंत्र आदिवासी जमात आहे. हे लोक बिब्याचे तेल विकतात. मोठे शूर शिकारी आहेत. १७. **आधारी** म्हणजे शैली वा झोळणा नव्हे तर बसायचे घडी करता येण्यासारखे लाकडी आसन (stool). वेरुळ येथील कैलास लेणीत (क्र. १६) मध्ये महाभारताच्या शिल्पपटाच्या समोरच्या भागाला पटिसाळेच्या खालच्या बाजूला आधारीवर बसलेला जोगी दिसतो. १८. **आंब पिणे** यात हरभऱ्याच्या रोपावरची आंब अभिप्रेत आहे. ही फार तेज आम्लमय असते. श्रीचक्रधरांवर स्वैर आरोप करणाऱ्यांना ओखटा आळोंचू पाळोंचू करणारांना - जाणिवा आंब न पिया म्हणजे मौन धारण करू नका असे कसे म्हटले जाईल? आंब पिल्याने आतडी जळतात. स्वतःचेच नुकसान होते. परमेश्वर अवताराला पीडा करणे म्हणजे स्वतःचेच नुकसान करून घेणे - जाणत असून आंब पिणे. १९. **आळोंच** अथवा आळोंच-पाळोंच म्हणजे आरोप-प्रत्यारोप. लुंचपलुंचा असा शब्द वज्जालग्ग (गाथा क्र. १५) या गाथाकोशात आहे. २०. **इटीमिटी** (पाठभेट उगुमुगु, लीचपू लीला क्र. ५७१) म्हणजे संध्या करतानाच्या ध्यानाचा विनोदी उल्लेख. २१ **उपांगराजी** मार्कंडी शिलालेखात भेटतो. उपांग हा संगीतातील पारिभाषिक शब्द आहे. (अंग-च्छायानुकारित्वादुपांग कथ्यते बुधैः, संगीतसमयनुसार, अध्याय ३, श्लोक २.) याच

लेखात पुढे 'संगीत गुणनिधी' असा शब्द आल्यामुळे हा उपांगराओ सैन्याच्या एखाद्या विभागाचा प्रमुख वाटत नाही. उपांगराओ हे पद संगीतसंबद्ध वाटते. **२२. उभेमार्गी** म्हणजे स्वदेशी आणि परदेशी व्यापार करणारा हा अर्थ योग्य आहे. (पहा Hyderabad Archaeological Series, III, Glossary) त्याचा दोन मार्गांचा अनुयायी असा अर्थ करण्याला कसलाही आधार नाही. **२३. कटक** या शब्दाचे राजधानी आणि सैन्य असे दोन अर्थ संभवतात. राजधानीच्या संदर्भात तो कट - मोक्याची जागा (नरद कटावर बसली) - यापासून व्युत्पादावा लागतो. नरींद्राच्या रुक्मिणीसैंवर या काव्याच्या काही प्रतींत 'ते कट वानताये' कवी नरींद्रु यादवरायाचे असा पाठभेद आहे. इब्न बतूता इ. इ. १३४० च्या आसपास देवगिरी येथे आला होता. त्याने कटक नामक नगराचा उल्लेख केला आहे. कल्याणी राजधानीलाही कल्याण कटक म्हणत. (किट्टेलचा कोश पहा.) **२४. कडीत** म्हणजे धूळपाटी नव्हे. तर कागद अथवा चामडे काळे करून त्यावर खडीने आय-व्यय लिहीत. त्यांना कडित म्हणत. असा हिशेब लिहिणारांना कडितामात्य म्हणत. शिलाहार गंडरादित्याच्या कोल्हापूर ताम्रपटात (शक १०४८) कडितामात्थ भेटतो. (शिराकोले. पृ. २७४) **२५. कविडिंभ** म्हणजे बालकवी. डिंभ म्हणजे अंडे (बंगाली डिम), लक्षणेने बालक. **२६. किन्नर** अश्वमुखी नसतो.शरीर कोंबड्याचे (वा मोराचे) आणि मुख मानवाचे असा तो मिश्रप्राणी (Composite animal) आहे. नरींद्र त्याला 'पाखिरुं' पसिया, खेचरू म्हणतो. (रुक्मिणी स्वयंवर, अनुक्रमे ओवी क्र. १६१, १६३, १६९). अजिंठा लेणे क्र. १७ मध्ये व्हरांड्यातील समोरच्या भिंतीवर अतिशय सुंदर किन्नर चित्र आहे. २७. कीर्तिकठीया म्हणजे देवळातील गुरव. (कीर्ति = मंदिर, कठीया = कण्टिया = गुरव) २८. कोळपुरुष म्हणजे विष्णूचा वराह अवतार. त्यास आदिकोल म्हणतात. (रामचंद्र यादवाचा रामटेक शिलालेख., सरदेसाई स्मारक ग्रंथ. पृ. १३१-१३४. कल्पान्तेदशकंधरारिसदने सोऽत्रादिकोल प्रभुः।) या आदिवराहाचे अंकन कमळाच्या पाकळीवर श्रीचक्रधरांनी करावे असे रामदेव दादोस विनवीत आहेत. **२९. खळी** बैसावेया नेणे म्हणजे धान्याच्या खळ्यावर राबावयास नेणे. खळीची वस्त्रे म्हणजे खळ (Starch) लावून इस्त्री केलेली वस्त्रे. **३०. खांडसाळ** म्हणजे पडकी ओवरी नव्हे. हा खांड आणि शाळा या दोन शब्दांचा अनुवाद जोडशब्द





अनुक्रमणिका

(Translation compound) आहे. खंडिका म्हणजे शाळा. वेदखंडिका म्हणजे वेद शिकविण्याची शाळा. (बांदोडे शिलालेख. प्रामकोले. पृ. ३१२. वेदखंडिकेचे कुळाग्र.) बालखंडिका म्हणजे लहान मुलांची शाळा. पैठणजवळ निहामांडवा येथे बालखंडिका आहे. मालखांड म्हणजे मल्लशाळा. (श्रीकृष्णचक्रवर्ती मालकांडा बीजे केले : लीचपू. लीळा. क्र. ४७५ 'जैसे मालखांडा श्रीकृष्णचक्रवर्ती सकळ लोकीं देखिलें:') **३१. गडी** म्हणजे खेडेवजा गाव नव्हे. गडे म्हणजे देशाच्या सीमेवरचा भाग. (देसाचा सेवट. आचारबंद, वचन ३५, पृ. ११९) **३२. ग्रीदाग्रीदी** म्हणजे पहाऱ्या पहाऱ्याने हा अर्थ ठीक. पण मूळ शब्द वृत्त. गोल फिरून. त्यापासून वृत्तावृत्त > गीर्दागीर्द 'व' चा 'ग' झाला. जसे वृक्ष > गुर्ग म्हणजे लांडगा. गीदीगीर्द हा शब्द ग्रीदाग्रीद असा उपयोजिला. जसे प्रसराम > परसराम, बिरुद > ब्रीद. **३३. चर्म** म्हणजे भूर्जपत्र हा अर्थ नीट होत नाही. ज्ञानेश्वरीत (अध्याय ९, ओवी ४५०) स्पष्टपणे चामडे हाच अर्थ अपेक्षित आहे. महाराष्ट्रासारख्या उष्ण प्रदेशात भूर्जपत्र दुर्मिळ, ते टिकतही नाही. चामड्यावर लिहिले जाई असे सुबंधूच्या वासवदत्ता नाटकावरून कळते. (प्राचीन भारतीय लिपिमाला, पृ. ११४ त.टी. २४) **३४. चास** म्हणजे नदीच्या दोन खडकांमधून वाहणारे अरुंद पात्र. पैठण येथे श्रीचक्रधर या चासाकडे जात. या चासावरच नाथसागर धरण उभे आहे. चासनळी असेही म्हटले जाते. बिहारात चासनाला गावी कोळशाच्या खाणी आहेत. चास शब्दातही अरुंद नाली-नांगराची रेघ-हाच अर्थ आहे. **३५. चौथरीया** आसू म्हणजे चार आसूंच्या किंमतीचे नाणे. थर म्हणजे नाणे. चोरथर म्हणजे खोटे नाणे. (मूर्तिप्रकाश, ओवी ५७३, ज्ञानप्रबोध, ओवी ५८० उद्धवगीता, ओवी (६३५). **३६. जगताप** म्हणजे जगाला ताप देणारा नव्हे. तो जगज्झंप > जगझांप > जगथाप > जगताप असा बदलत गेला. शत्रूंच्या नगरांच्या भिंती (जग, जगती) ओलांडून जातो तो जगझंपन असा अर्थ मेरूत्तुंगाच्या प्रबंधचिंतामणीत आहे. (पृ. २५) **३७. जुंईचा** ओथंबा यात जुं म्हणजे जुगाराचा खेळ (जुंईचा) आणि ओथंबा म्हणजे तटस्थ निर्णायक (umpire) हाच भाव आहे. जुई या पुष्पविशेषाचा अर्थाअर्थी संबंध नाही. **३८. टेक** म्हणजे उचंवटा हे खरे. पण टेकीचा राया म्हणजे विदर्भात बारशी टाकळी नामक गाव (जि. अकोला) आहे. येथे एका अनाम राजवंशाचा लेख असून त्यात राजधानीचे नाव तेक्कली असे दिले

आहे. तेक्कली > टेक्कली > टेकी असा अपभ्रंश संभवतो. टेकीचा राया म्हणजे टेकळी-टेकी-टाकळी येथील राण्जा (EI. XXI, PP. 128-132) **३९. देवद्रणी** (देवद्रोणी) हे डोमेगाव येथील गोदावरी नदीतील डोहाचे नाव आहे. बदामी (प्राचीन वातापि, जि. विजापूर) येथील विशाल कुंडालाही देवद्रोणी म्हणतात. **४०. धामा** (मी) म्हणजे बाभळीच्या शेंगातील बिया. या खेळतांना 'दाम'म्हणून वापरतात. विदर्भात ग्रामीण मुले अजूनही धामोक्यांनी खेळतात. **४१. नगर** म्हणजे शहर हा अर्थ नंतरचा. नकर-नखर-नगर म्हणजे गावातील प्रतिष्ठित व्यापारी श्रेष्ठींची संघटना. हा शब्द अनेक शिलाताम्रशासनांमधून येतो. (EI., XXIV P. 292). दृष्टान्त पाठातील पंचनगरे, नवनगरे आता उलगडतात. नगरबाईलां ओवाळिले म्हणजे प्रमुख व्यापाऱ्यांच्या स्त्रियांनी ओवाळले. 'दामाचा विसोवा आसूपाठी नगरे दीन्हला' म्हणजे या श्रेष्ठींच्या संघटनेने (Guild) दिला. मात्र नगर विसावा म्हणजे प्रेत गावाबाहेर नेताना जिथे टेकवतात ती जागा. **४२. निनावा** अथवा देवगिरीचा निनावा म्हणजे ज्या रामचंद्र देव यादवाने श्रीचक्रधरांचे 'ओखटे' केले म्हणून त्याचे नावही महानुभाव पंथीय उच्चारीत नाही तो. **४३. पंचकौळ** आचार्य हा कौल मार्गिक तांत्रिक आहे. येथे पाच कुळांचा संबंध नाही. पांचौळी म्हणजेही पाच कुळांचा स्वामी नव्हे तर मंदिरातील पंचसमितीचा प्रमुख. **४४. पसुंबरी** म्हणजे झाडाची पाने हा अर्थ संभवत नाही. पसुंबरी खूप मोठी पिशवी. पडशी. अशा पिशव्या घेऊन व्यापार करीत हिंडणारे ते पसुबेवळ. (किट्टेल कोश. पृ. १०१९). मराठीत अनुस्वार अधिक आहे. **४५. पोमिनी** म्हणजे जाड मोठ्या पानांचा वृक्ष नव्हे. तर कमळाची वेल. पद्मिनी > पदुमिनी > पऊमिनी> पोमिनी हा अपभ्रंशक्रम. येथे जैन ग्रंथ पऊमचरिऊ (पद्मचरित) आठवतो. **४६. फरसाळ** हे फरसाणच. ण, ल, ळ यांत अभेद असतो. **४७. बोडणवावी** ही स्नानाची जागा. चहूंकडून दगडांनी बांधलेली. मध्ये ओटा. पाणी जाण्यासाठी मोरी. बोडण म्हणजे स्नान. कोकणस्थांत देवीला दह्यादुधांनी स्नान घालतात. त्याला बोडणच म्हणतात. पैठणला नाथांच्या वाड्यात ही बोडणवावी कालपरवापर्यंत होती. **४८. ब्रह्मण्यहत्य** हा चारठाणे शिलालेखातील पाठ अशुद्ध आहे. तो 'तेआ हत्या तेआ ब्राह्मणाची हत्या' असा हवा. **४९. मकर** म्हणजे मकरतोरण. हा शब्द कंधार येथील राष्ट्रकुलीन शिलालेखात. त्याचाच अपभ्रंश मखर असा आहे. **५०. मदवी** म्हणजे

उंची वस्त्रे हे खरे. पण मूळ शब्द कन्नड मदवी म्हणजे लग्न. त्या प्रसंगीची परंपरेने चालत आलेली उंची वस्त्रे. आमच्या घराण्यात ही मदवस्त्रे पुरोहिताकडे असतात. **५१.लोहे** म्हणजे मोठा हंडा. घारापुरी लेणीतील टाक्यात सापडलेल्या हंड्यावर तांबा पलै १९४ लोही कृतः असा लेख आहे. (डॉ. वि. भि. कोलते गौरवग्रंथ., पृ. ४९-५२). **५२. वांकद्वार** म्हणजे नगराचे वा महालाचे प्रवेशद्वार. यावर यक्ष असे. उपर्युक्त कंधार शिलालेखात यक्षद्वार असा शब्द आला आहे. यक्षासाठी वक, वंक, बंक असे शब्द आहेत. म्हणून यक्षद्वार ते बंकद्वार. त्यापासून बंगला. मध्यप्रदेशातील गोंड घराच्या समोरच्या भागाला बंगला म्हणतात. **५३. वण** म्हणजे मुळात कर (tax, पण) देवाला दिलेला बळी 'वण' च कारण तो देवाला दिलेला कर. **५४. वरो** म्हणजे वरवा, उकडा, रतीब. **५५. सावेद्धी** असे वझूर शिलालेखात नाही. खरे वाचन 'सांघेडि' असे आहे. **५६. सेल** म्हणजे केवळ टोकदार हत्यार नव्हे तर भाला. भाला चालविण्यात निपुण असलेल्या यादवनृपती द्वितीय भिल्लमाची सेल्लविदेग - ही पदवी त्याच्या संगमनेर ताम्रपटात (EI., II, pp. 212-221) आली आहे. राष्ट्रकूटांच्या एका मांडलिकाच्या ध्वजावर भाल्याचे चिन्ह होते. म्हणून त्यांना सेल्लकेतन म्हणत. शिलाहार हे कुलनामही सेलार या नावाचे संस्कृतीकरण (Sanskritization) असावे.

## संदर्भ आणि संक्षेप


१. लीचपू - लीळाचरित्र पूर्वार्ध, लीचउ - लीळाचरित्र उत्तरार्ध.
लीळाचरित्र. (सं.) डॉ. वि.भि. कोलते. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ दुसरी आवृत्ती. १९७८.

२. रुक्मिणी स्वयंवर. (सं.) वि. भि. कोलते. अरुण प्रकाशन. मलकापूर, १९६६.

३. सूत्रपाठ. (सं.) ह. ना. नेने, तिसरी आवृत्ती, १९३५.

४. मूर्तीप्रकाश. (सं.) वि. भि. कोलते. विदर्भ संशोधन मंडल, नागपूर, १९६२.

५. ज्ञानप्रबोध. (सं.) वि.भि. कोलते, अरुण प्रकाशन, मलकापूर, १९७३.

६. आचारबंद. (सं.) वि. भि. कोलते, अरुण प्रकाशन, मलकापूर, १९८२.

७. प्रामकोले. प्राचीन मराठी कोरीव लेख.(सं.) शं.गो. तुळपुळे,पुणे विद्यापीठ, १९६३

८. शिराकोले. शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, वा.वि. मिराशी,

विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९८४.
९. संशोधनमुक्तावलि, सर १ ते १०. वा. वि. मिराशी, विदर्भ संशोधन मंडळ, नागूपर
१०. संगीतरत्नाकर (सं.) सुब्रह्मण्यशास्त्री, मद्रास, १९१७.
११. विक्रमांकदेवचरित. (सं.) बुल्हर.
१२. Ibn Batatu. Travels in Asia and Africa Ed. Gibb. H.A.R., George Routelege and Company, London,
१३. EI. Epigraphia Indica
१४. IND. Inscriptions of Nanded District. Ed. Shriniwas Ritti, etal Yashwant College, Nanded, 1968
१५. ISD. Inscriptions of Solapur Distict. Ed. Shrinivas Ritti, etal Shrihari Prakashan., Dharwad, 1988.
१६. शोधमुद्रा. खंड १ ला, ब्रह्मानंद देशपांडे, कैलास पब्लिकेशन्स, औरंगाबाद.
१७. प्राचीन भारतीय लिपिमाला, गौरीशंकर हीराचंद ओझा, साहित्य अकादमी, दिल्ली १९७७.
१८. वज्जालग्ग (सं.) विश्वनाथ पाठक, पार्श्वनाथ विद्याश्रम शोधसंस्थान, वाराणसी, १९८४
१९. कोलते गौरव ग्रंथ. सं. वामनराव चोरघडे, नागपूर विद्यापीठ, नागपूर.
२०. सरदेसाई स्मारक ग्रंथ.

■■■

---

**शब्द आणि अर्थ**

शब्द हे अर्थवाही असतात. शब्द उच्चारताच आपणास अर्थाचा बोध होतो. शब्द आणि अर्थ यांतील ही एकरूपता लक्षात घेऊनच महाकवी कालिदासाने आपल्या महाकाव्याच्या प्रारंभी शंकर आणि पार्वती ह्यांना वंदन करताना पुढील मनोज्ञ श्लोक लिहिला.

वागर्थाविव संपृक्तौ वागर्थ प्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वन्दे पार्वती परमेश्वरौ ॥

(वाणीतून अर्थ प्राप्त होण्यासाठी जसे वाणी व अर्थ एकरूप असतात, त्याप्रमाणे एकरूप असलेल्या पार्वती व शिव या जगाच्या मातापित्यांना मी वंदन करतो.)

---

## मराठी भाषेच्या विविध छटांचे मनोज्ञ दर्शन घडविणारा लेखसंग्रह - 'बोलभाषा'

**परीक्षणकार : प्रा. ग. प्र. प्रधान**

आपण आपल्या मातृभाषेत बोलतो, आणि मातृभाषेतील लेखन सहज वाचतो. त्यामुळेच मातृभाषेच्या वैशिष्ट्यांचा आपण फारसा विचार करीत नाही. सुमन बेलवलकर या अनेक वर्षे डेक्कन कॉलेजमध्ये जाणत्या अमराठी विद्यार्थ्यांना मराठी भाषा शिकवितात. या अध्यापनामध्ये आपण ज्या गोष्टी गृहीत धरतो, त्यातील अडचणी त्यांच्या लक्षात आल्या, त्याचप्रमाणे त्यांना त्यांच्या अध्ययनातून आणि व्यासंगातून मराठी भाषेच्या खास लकबी, जीवनातील विविध अनुभव थोड्या शब्दांत ठसठशीतपणे मांडण्याचे, काही वेळा चित्ररूप शैलीत व्यक्त करण्याचे मराठी भाषेचे सामर्थ्य लक्षात आले. या त्यांच्या अध्ययन-अध्यापनातील विविध अनुभवांचे मनोज्ञ दर्शन घडविणारा हा लेखसंग्रह आहे. मराठी भाषेवरचे डोळस प्रेम, मराठी संस्कृतीचा उत्कट अभिमान आणि जीवनातील विविध अनुभव, भाषा व्यवहारातून कसे प्रकट होतात याचा सूक्ष्म अभ्यास, या तीन सूत्रांमध्ये हा लेखसंग्रह गुंफलेला आहे.

'शब्देविण संवादिजे' हा एक सुंदर लेख आहे. तीन महिन्यांची छोटी गऊ वाऱ्याची झुळुक आल्यावर झाडाच्या हलत्या पानाकडे पाहून हसली याचे वर्णन सुमनताई करतात, 'तिने झाडाशी सांधलेला हा संवाद होता!' मुलांची आकलनशक्ती कशी वाढत जाते आणि वार्धक्यात अनेक माणसे कशी अबोल होत जातात हे सांगून सुमनताई लिहितात, 'माणूस जेवढा संवाद साधतो, सांगतो, बोलतो तेवढाच तो जगतो.'

आहार आणि भाषा या दोन्हींचा जिभेवर संचार असतो असे सांगून मांसाहारी पदार्थांच्या विविधतेमुळे त्यांचे वर्णन करणाऱ्या भाषेतही किती छटांचे शब्द आले आहेत याचे वर्णन एका ठिकाणी आहे; तर दुसऱ्या ठिकाणी उखाण्यांमधून नवऱ्याचे नाव ज्या रीतीने घेतलेले असते त्यावरून समाजातील विविध थरांतील स्त्रियांची जगण्याची रीत कशी समजते आणि एखादा उखाणा जीवनाचा दाहक अनुभवही कसा अल्पाक्षरात सांगून जातो, हे सांगितले आहे. शेजाऱ्याच्या भाषेतील खवचटपणा, उपहास या वैशिष्ट्यांचा





अनुक्रमणिका

जसा सुमनताई उल्लेख करतात. त्याचप्रमाणे मातृभाषेतील सणसणीत शिवीचेही त्या अचूक वर्णन करतात. उर्दूतील आदब 'जहन्नममें जाईअे' यात व्यक्त होते आणि गुजराथी भाषेत शिव्यांवरही तुपाची धार असते, हे सांगतानाच मालवणी भाषेतल्या अर्वाच्य शिव्यांचा उल्लेख करून सुमनताई लिहितात: शिवीच्या प्राणांतिक ठसक्यावरच तिचा दर्जा अवलंबून असतो. शिवीचे असे तिखट जाळ वर्णन करणाऱ्या सुमनताईंच्या 'बोलाफुलाला गाठ' या काव्यात्म आशयाच्या लेखात, तमिळ स्त्री मराठीतील 'अबोली' हे फुलाचे नाव सार्थ आहे हे सांगताना म्हणते, सुगंध ही फुलाची बोली. तीच या फुलाला नाही.

आडनावांमुळे जातीजातींमधील मनाला दुखवणारा उच्चनीच भाव कसा व्यक्त होतो हे सांगितल्यावर बेलवलकर बाई लिहितात, 'आडनावं' अडगळीत टाकायला हवीत. माणसानं नाव कमवावं, नाव राखावं, आडनावात काय आहे?

अशिक्षितपटुत्वम् या लेखात जनसामान्यांच्या बोलण्यात व्यवहारज्ञान अल्पाक्षरांत कसे व्यक्त होते हे सांगितले आहे, त्याचप्रमाणे दुसऱ्या एका लेखात दर्पोक्तीचे मार्मिक विवेचन आहे. वाणी स्त्रीरूपिणी आणि कृषिवलांच्या उक्ती हे लेखही वाचकाला भाषेच्या अंतरंगात नेतात.

सरळ नसलेलं रूप या लेखामध्ये मराठी भाषेतील नामे, सर्वनामे, आदींच्या सामान्य रूपांमधील फरक अन्य भाषिकांना समजणे कसे कठीण आहे हे प्रांजळपणे सांगितले आहे. त्याच बरोबर अनेक लेखांतून सुमनताईंचा मराठीचा उत्कट अभिमान विविध तऱ्हेने व्यक्त झाला आहे. इंग्रजी माध्यमातून शिकणाऱ्या मुलांची आकलनशक्ती कशी खुरटली आहे हे त्यांनी स्पष्टपणे सांगितले आहे. माध्यमिक शिक्षणापर्यंतच्या इंग्रजी माध्यमाच्या सर्व शाळांना टाळी ठोकली पाहिजेत हा त्यांचा अभिप्राय योग्यच आहे. त्याच बरोबर माध्यमिक शाळेत आणि महाविद्यालयातही, इंग्रजी उत्तम रीतीने शिकवताना त्या भाषेचा माध्यम म्हणून उपयोग फक्त उच्च विज्ञानासारख्या विषयातच करणे युक्त होईल असेही त्यांनी अधिक स्पष्टपणे सांगावयास हवे होते. 'श्री गणेशाच का?' या लेखात सुमनताईंनी लिहिले आहे :

आता बड्यांची मुलं बडी म्हणून, मध्यम वर्गीयांची पुढे बडी होण्यासाठी आणि कनिष्ठ वर्गाची आपण मागे राहिलेल्या अपराधाचं परिमार्जन करण्यासाठी इंग्रजी माध्यमाच्या

शाळेत घुसण्यासाठी धडपडतात. बड्या आणि मध्यमवर्गीय मुलांच्या बद्दलचे त्यांचे विधान बरोबर आहे. परंतु कनिष्ठ वर्गातील मुलांबद्दल 'त्यांच्यावर आजवर अन्याय करून तथाकथित उच्चवर्णीयांनी त्यांना मागे ठेवले ही परिस्थिती बदलण्यासाठी' असे लिहावयास हवे होते.

भाषा शुद्ध लिहिली गेली पाहिजे आणि शुद्ध बोलली पाहिजे हा विचारही सुमनताईंनी सुंदर रीतीने मांडला आहे. त्या भाषा कोविद असल्यामुळे पाणिनीचे मोठेपण त्यांनी मार्मिकपणे सांगितले आहे. शेजाऱ्यावर प्रेम करा हे सांगताना आपण भारतातील अन्य भाषा शिकल्या पाहिजेत, त्या भाषांतील साहित्याचा रसिकतेने आस्वाद घेतला पाहिजे, हेही त्यांनी आग्रहाने सांगितले आहे. विष्णुपदी या लेखात भाऊसाहेब खांडेकरांच्या मुळे भारतातील तमिळ, गुजराती आणि अन्य भाषिक वाचक मराठी साहित्यावर कसे प्रेम करू लागले हा अनुभव अतिशय सुंदर रीतीने मांडला आहे.

मी मराठीवर प्रेम करणारा एक वाचक. परंतु मातृभाषेच्या सर्व वैशिष्ट्यांचा मी सूक्ष्म विचार केला नव्हता. बेलभाषा हे पुस्तक वाचताना मराठीच्या कितीतरी नवीन छटा उमगल्या.

श्रीमती बेलवलकर यांच्याजवळ भाषेच्या सूक्ष्म ज्ञानाप्रमाणेच तरल विनोदबुद्धीही आहे. विवेचनाच्या ओघात त्यांनी सहजपणे भंपक प्रवृत्तींच्यावर तडाखे मारले आहेत.

असे सुंदर पुस्तक प्रसिद्ध करणाऱ्या राज्य मराठी विकास संस्थेस मनःपूर्वक धन्यवाद.

**९२६, बॅ. गाडगीळ रस्ता,**
**सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.**

■■■





अनुक्रमणिका

१. ‘मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन’ची वर्गणी :

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे:

वार्षिक वर्गणी -

संस्थेला १०० रु.
व्यक्तीला ७५ रु.
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

२. पैसे भरण्याबद्दल सूचना :

वर्गणी रोखीने किंवा धनादेश /मनिऑर्डर ने देता येईल. धनादेश ‘मराठी अभ्यास परिषद’ या नावाने काढावा. धनादेशासोबत/ मनिऑर्डर कूपनवर आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी हे अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. पावती दिली जाईल. वर्गणी व तत्संबधी पत्रव्यवहाराचा पत्ता : मृणालिनी शहा, कार्यवाह, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे- ४११००४

३. मागील अंक :

‘भाषा आणि जीवन’ हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु २०/-

४. प्रकाशने :

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक ‘निवडक भाषा आणि जीवन’ (किंमत रु.२००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच ‘भाषांतर मीमांसा’ हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनकडे उपलब्ध आहे.

५. जाहिरातीसाठी दर :

पूर्णपान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५०रु, शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन/चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३




मराठी भाषेबद्दल अशा प्रकारची सुटसुटीत आणि चटकदार संदेशवाक्ये हवी आहेत.

संपर्क :

**मराठी अभ्यास परिषद**

१ शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे,
पुणे ४११००४. (दूरध्वनी ५४३३८६९)